






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

**ह्या विशेषांकाचे संपादन:** प्र॰ना॰ परांजपे (मुख्य संपादक), विजया देव (अभ्यागत संपादक), विजय पाध्ये (कार्यकारी संपादक)

**संपादन-समिती:** आनन्द काटीकर, सरोजा भाटे, सलील वाघ, विजया चौधरी

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय व संपादकीय पत्रव्यवहार, लेख व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता:** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, बी-5/16, सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051; संपर्क: चलभाष 094216 10704; ई-पत्ता: marathi.abhyas.parishad@gmail.com

**मुद्रणस्थळ:** एकवीरा पब्लिसिटी, सर्व्हे क्र॰ 1/27+29, माउली सोसायटी, विठ्ठल-मंदिरामागे, कर्वेनगर, हिंगणे, पुणे 411 052.

| **वार्षिक वर्गणी** | **एक वर्ष** | **तीन वर्षे** | **पाच वर्षे** |
|---|---|---|---|
| व्यक्तींसाठी | ₹१५०/- | ₹४००/- | ₹७००/- |
| संस्थांसाठी | ₹२००/- | ₹५५०/- | ₹९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹४०/-. कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.

**मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹२०००/- + नोंदणी शुल्क ₹१००/-.** आजीव सदस्यांना पत्रिकेचा अंक पाठवला जातो.

वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, थेट (ऑनलाईन) भरणा करून (बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे; बचत खाते क्र॰ 20057164260; IFS Code MAHB0000041) देता येईल. धनादेशाने द्यायची असल्यास धनादेश '**मराठी अभ्यास परिषद**' ह्या नावाने काढावा. पुण्याबाहेरील कोणत्याही बँकेचा वा शाखेचा असल्यास व 'ॲट पार' वटणारा नसल्यास वटणावळ म्हणून धनादेशाच्या रकमेत ₹५०/- भर घालावी. वर्गणीदारांनी कोणत्याही प्रकारे रकमेचा भरणा करताच परिषदेस पत्राने किंवा ई-पत्राने, किंवा 094216 10704 वा 099236 71820 ह्या चलभाष क्रमांकावर लघुसंदेश (SMS) पाठवून आपले नाव, पत्ता, रक्कम, वर्गणी कोणत्या अंकापासून/वर्षापासून घ्यावी ते कार्यवाहीच्या प्रक्रियेसाठी कळविणे आवश्यक आहे.

**जाहिरातीचे दर:** पूर्ण पान ₹२,५००/-, अर्धे पान ₹१,५००/-, पाव पान ₹८००/-, शुभेच्छा ₹४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹३०००/-.

**प्रकाशन:** त्रैमासिक; जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

---

सूचना: (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या वा लेखकांच्या मतांशी संपादक वा परिषद सहमत असतीलच असे नाही. (२) **ह्या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि, ह्या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्यसंस्कृती मंडळ वा राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**ह्या अंकाची किंमत ₹९०/-**

# अनुक्रमणिका



# विशेष आभार


ह्या अंकाच्या निर्मिती-प्रक्रियेत सर्वश्री निषाद अ॰ केळकर, अतुल पेठे, कुमार गोखले, सायली दिवाकर ह्यांच्यासह अनेकांचे साहाय्य मिळाले आहे. त्याबद्दल मराठी अभ्यास परिषद त्यांची आभारी आहे.



# माझे (निरीश्वरवादी) बाबा...

रोशन रानडे

मुलांना संस्कारित करणे म्हणजे पुढे बसवून 'शुभं करोति' म्हणवून घेणे नव्हे, तर हे संस्करण आपल्या वागण्यातून आपल्या आचार-विचारातून होणे आवश्यक असते, या पद्धतीवर त्यांचा विश्वास होता. ते संपूर्णपणे निरीश्वरवादी होते. परंतु आम्हीही तसेच व्हावे, असा त्यांनी कधीही आग्रह धरला नाही. माझी आई मोठ्या कुटुंबातून आलेली. त्यामुळे आपले सणवार, समारंभ यातून आपली कुटुंबपद्धती टिकून आहे, असा तिचा गाढा विश्वास. त्यामुळे ती आमच्यावर हे संस्कार करीत होती, त्याला त्यांनी कधी शब्दाने आडकाठी घातली नाही. त्यांच्या या वृत्तीचा आम्हा दोघा भावंडांवर खूप खोलवर परिणाम झालाय. यथावकाश मी आणि माझा भाऊ निषाद निरीश्वरवादी झालो, पण तरीही इतर सर्व धर्म-संस्कृतींचा आदर करायला शिकलो. आपल्या नास्तिकपणाचा जो प्रचार करतो, तो निधर्मी नसतो. आपली विचारधारा दुसऱ्यावर न लादणे, हे एका निधर्मी व्यक्तीसाठी आवश्यक आहे, हे मी तरी त्यांच्या वागण्यातून शिकले.

त्यांनी कधी चुकूनही देवाला नमस्कार केलेला मी बघितला नाही. अतिशय अवघड प्रसंगीही त्यांचा धीर खचून ते ईश्वराकडे वळलेले मी बघितले नाही. त्यामुळे तुम्हाला निरीश्वरवादी विचारधारा आत्मसात करायची असेल तर बाक्या प्रसंगी ईश्वराकडे वळायचा भोंगळपणा करता येत नाही.

संपूर्ण निरीश्वरवादी असूनही त्यांचा धर्मविषयक अभ्यास अतिशय खोलवर होता. त्यामुळेच यावर त्यांच्याशी कोणी वाद घालू लागला तर त्याला निरुत्तर करण्यासाठी लागणारी त्यांची वैचारिक बैठक पक्की होती. त्यांनी जे काही कार्य केले, ते त्यांचे श्रेयस होते, म्हणून त्यांनी ते केले.










अनुक्रमणिका



# अशोक रा० केळकर

प्र॰ना॰ परांजपे

अशोक रा० केळकरांच्या देहावसानानंतर 'भाषा आणि जीवन'चा केळकर विशेषांक काढायचे निश्चित करण्यात आले. उन्हाळा व पावसाळा असा हा जोडअंक काढायचे ठरले. लेखकांकडून लेख मिळवणे, त्यांचे संपादन व मुद्रण करणे आणि वर्गणीदारांच्यापर्यंत अंक पोचणे ह्या सगळ्याच टप्प्यांना अपेक्षेपेक्षा जास्त उशीर झाला. किंबहुना गेले वर्षभर अंकांना अक्षम्य उशीर झाला आहे ह्याची आम्हांला जाणीव आहे. संपादकांचे प्रकृतिअस्वास्थ्य, कार्यवाह व संपादक-मंडळाच्या सदस्यांची अन्य कामे, संस्थेच्या नोंदणीचे नूतनीकरण करण्याचे काम गेली काही वर्षे मागे पडल्याने टपाल कचेरीकडून येणारे अडथळे, अशी अनेक कारणे ह्यासाठी सांगता येतील. त्यामुळे ह्या विशेषांकासाठी एक अभ्यागत संपादक नेमण्याचा प्रयोगही आम्ही केला. डॉ० विजया देव ह्या भाषाविज्ञान व मराठी ह्या दोन्ही विषयांत एम०ए० असून भाषाविज्ञान ह्या विषयात त्यांनी पीएच०डी० संपादन केली आहे. डॉ० केळकरांच्या त्या विद्यार्थिनी आहेत व 'भाषा आणि जीवन'च्या संपादकपदासाठी डॉ० कल्याण काळ्यांच्या निवृत्तीनंतर डॉ० केळकरांनी त्यांची निवड केली होती. परंतु ह्या विशेषांकाचे काम संपण्यापूर्वी त्यांना परदेशी जावे लागले. त्यामुळे ह्या अंकाची योजना आखून काही लेख त्यांच्याकडे सोपवून मी परदेशी गेलो. तेथून परत आल्यानंतर हे काम परत माझ्या हाती आले. माझ्या संपादनाखालचा हा शेवटचा अंक आहे. ह्यानंतरच्या दिवाळी २०१५ अंकापासून 'भाषा आणि जीवन'चे संपादन विजय पाध्ये, आनंद काटीकर व सलील वाघ हे संयुक्तपणे करतील.

केळकर विशेषांकाच्या विलंबाबद्दल लिहिताना एका योगायोगाचे स्मरण झाले. केळकरांच्या संदर्भात विलंब हा जवळजवळ स्थायिभाव झाला होता. त्यांची मराठीतील पहिली पुस्तिका (पृष्ठे ९६) – 'मराठी भाषेचा आर्थिक संसार' १९७७ ह्या वर्षी म्हणजे केळकरांच्या वयाच्या ४८व्या वर्षी प्रकाशित झाली. त्यांचा पहिला लेखसंग्रह 'वैखरी' १९८३ ह्या वर्षी म्हणजे केळकरांच्या वयाच्या ५३व्या वर्षी प्रकाशित झाला. प्रकाशकांनी त्याच्या १५०० प्रती छापल्या होत्या त्या संपायला १९९८ साल उजाडले आणि त्याची दुसरी आवृत्ती दुसऱ्याच एका प्रकाशकाने मनावर घेतल्यामुळे २००७ साली – म्हणजे पहिल्या आवृत्तीनंतर २४ वर्षांनी

प्रकाशित झाली. पुणे विद्यापीठाच्या तत्त्वज्ञान विभागाने केळकरांची 'प्राचीन भारतीय साहित्यमीसांसा' ह्या विषयावरची व्याख्याने आपल्या 'परामर्श' ह्या नियतकालिकाचा विशेषांक म्हणून १९७९ साली प्रकाशित केली. ती ग्रंथरूपाने मराठीत अजूनही प्रकाशित झालेली नाहीत. स०प० महाविद्यालयाचे तत्कालीन प्राचार्य ह०श्री० साने ह्यांनी त्यांचा ग्रंथरूपाने हिंदी अनुवाद केला. दिल्लीच्या राजकमल प्रकाशनाने तो प्रसिद्ध केला व त्याला मध्यप्रदेश शासनाचा पुरस्कारही मिळाला. पण मराठी प्रकाशनविश्वाची शांती ढळली नाही! 'मध्यमा' हा ह्यांचा दुसरा लेखसंग्रह १९९६ साली म्हणजे केळकरांचे वय ६७ वर्षे होते तेव्हा प्रसिद्ध झाला. त्याचीही आवृत्ती संपली पण त्याचे पुनर्मुद्रण करायला एकही प्रकाशक पुढे आलेला नाही. केळकरांना पद्मश्रीचा लाभ झाला तो त्यांच्या वयाच्या ७३व्या वर्षी अणि साहित्य अकादेमीचा पुरस्कार मिळाला तो त्यांच्या वयाच्या ७९व्या वर्षी, तोही लोकवाङ्मयगृह ह्या प्रकाशनसंस्थेच्या सतीश काळसेकरांनी आस्थेने, जिव्हाळ्याने व केळकरांच्या सर्व अटी सांभाळून त्यांचा 'रुजुवात' हा लेखसंग्रह प्रकाशित केला म्हणून.

पण पुस्तके प्रकाशित व्हायला विलंब झाला तरी एक भाषावैज्ञानिक म्हणून त्यांचा दरारा भारतातील सर्व विद्यापीठे व महाविद्यालये ह्यांमध्ये १९७०पासूनच निर्माण झाला होता. १९५६ ते १९५८ ह्या दोन वर्षांत त्यांनी कॉर्नेल विद्यापीठातून चार्ल्स हॉकेट ह्या जगप्रसिद्ध भाषावैज्ञानिकाच्या मार्गदर्शनाखाली पीएच०डी० संपादन केली. केळकरांनी इंग्रजी, मराठी व हिंदी ह्या तिन्ही भाषांत लेखन केले. पण सलग पुस्तकरूपात त्यांनी मराठीत लेखन केले नाही त्याबद्दल मी त्यांना एकदा विचारले, ''डॉ० रा०भा० पाटणकरांच्या 'सौंदर्यमीमांसा' ह्या ग्रंथाप्रमाणे तुम्ही भाषाविज्ञानाबद्दल एखादा ग्रंथ का लिहीत नाही?'' त्यावर त्यांनी उत्तर दिले होते की ''चिकाटीनं ग्रंथलेखन करण्याचा माझा स्वभाव नाही. दुसरी गोष्ट अशी की पाटणकरांच्या सारखं पूर्वसूरींच्या विचारांचा मागोवा घेत घेत बृहद् ग्रंथ लिहिणं ही लेखनाची एक पद्धत झाली. त्या विषयात स्वतःला सांगण्यासारखं जे असेल तेवढं सांगून मोकळं होणं ही दुसरी पद्धत. मला दुसरी पद्धत भावते.''

'भाषाशास्त्र' ह्या १९६०पर्यंत रूढ असलेल्या शब्दाऐवजी 'भाषाविज्ञान' ह्या शब्दाचा केळकरांनी सातत्याने आग्रह धरला. त्यांचे म्हणणे असे होते की 'फिलॉलजी'ला प्रतिशब्द म्हणून भाषाशास्त्र हा शब्द मराठीत आला. शब्दांच्या व्युत्पत्ती, त्यांचा उगम आणि विकास, विविध भाषांमधला ऐतिहासिक संबंध, भाषेचा इतिहास व विकास इत्यादींच्या अभ्यासाचा समावेश 'फिलॉलजी' किंवा भाषाशास्त्रामध्ये होतो. पण भाषेचा भाषा म्हणून वैज्ञानिक पद्धतीने अभ्यास करणारी

एक नवीनच ज्ञानशाखा सोस्यूर, ब्लूमफील्ड इत्यादींच्यामुळे प्रस्थापित झाली, ती 'लिंग्विस्टिक्स' किंवा भाषाविज्ञान.

खरं म्हणजे 'भाषाविज्ञान' ह्या संज्ञेप्रमाणे स्वनविज्ञान, रूपविज्ञान, वाक्यविन्यास, अर्थविज्ञान ह्यांसारख्या इतरही संज्ञा मराठीला अपरिचित होत्या. त्यांतही 'स्वन' व 'स्वनिम' 'रूप व रूपिम' इत्यादींमध्ये काय फरक आहे हेही अनेकांना कळत नसे. (काहींना तो अजूनही कळला नसावा) म्हणून केळकरांसारख्या अधिकारी व्यक्तीने भाषाविज्ञानाची ओळख करून देणारे पुस्तक मराठीत लिहिणे गरजेचे होते. तसे झाले असते तर भाषाविज्ञान मराठीत रुजले असते. डेक्कन कॉलेजमधील उन्हाळी वर्गांना हजेरी लावलेल्या काही प्राध्यापकांनी भाषाविज्ञानाच्या एकेका घटकावरील लिहिलेले लेख एकत्र करून पुस्तके प्रसिद्ध केली पण अशा फुटकळ पुस्तकांचा परीक्षांमध्ये उत्तरे लिहिण्यापेक्षा अधिक काय उपयोग होणार? विद्यापीठांतील लिंग्विस्टिक्स इंग्रजी माध्यमातून शिकवले जाई. अजूनही जाते. पण मराठीच्या व्यवस्थेवर तेथे संशोधन होत नाही. मराठी विभागात एखादी प्रश्नपत्रिका भाषाविज्ञानाची! त्यामुळे पोपटपंचीपेक्षा वेगळे काही घडू शकत नव्हते. साहजिकच ती प्रश्नपत्रिका वैकल्पिक होऊन आता वगळली जाण्याच्या मार्गावर आहे.

केळकरांनी हिंदीत लिहिलेल्या लेखांचा 'त्रिवेणी' हा संग्रह २००४मध्ये 'भाषा-साहित्य-संस्कृति' या उपशीर्षकासह प्रसिद्ध झाला. 'रुजुवात'चे उपशीर्षकही 'आस्वाद : समीक्षा : मीमांसा' असे आहे. केळकरांना भाषाविज्ञानाखेरीज शब्दकोश, साहित्य, कलामीमांसा, भाषांतर, चिन्हविज्ञान, संगीत, नृत्य, नाटक इत्यादी प्रयोगक्षम कला, चित्रपट, ललितकला, शिक्षण, संस्कृती अशा इतर अनेक विषयांत रस होता. नुसता रसच होता असे नव्हे तर त्या विषयांतही त्यांनी लेखन केले. कधी कधी असे वाटते की नाना विषयांच्या आकर्षणामुळे आणि त्या सगळ्यांत गतीही असल्यामुळे केळकरांकडून मराठीत पुरेसे लेखन झाले नाही का? प्रकाशकांच्या नकारात्मक वर्तनामुळे त्यांच्याकडून लेखन झाले नाही का? मराठीच्या व्याकरणावर त्यांनी लिहिणे आवश्यक होते; ते त्यांनी लिहिले पण इंग्रजीत! मराठीतील वाक्याच्या घडणीसंबंधी त्यांनी 'लँग्विज इन अ सेमिऑटिक पर्स्पेक्टिव्ह : दि आर्किटेक्चर ऑव्ह अ मराठी सेंटेन्स' अशा लांबलचक शीर्षकाचा ६५६ पृष्ठांचा ग्रंथ लिहिला आणि मुख्यमंत्री निधीतून आर्थिक साहाय्य मिळाल्यामुळे तो १९९७मध्ये प्रसिद्ध झाला. त्याचे मराठी भाषांतर होणे आवश्यक आहे. मैसूरच्या केंद्रीय भारतीय भाषा संस्थेने केळकरांचे सर्व लेखन त्यांच्यासाठी स्वतंत्र पोर्टल तयार करून (http//www.ciil-ebooks.net) वर उपलब्ध केले आहे. इंग्रजी-मराठी-हिंदी ह्या

तिन्ही भाषांतील त्यांच्या लेखांची आणि ते प्रसिद्ध करणाऱ्या आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय व मराठी नियतकालिकांची नावे वाचली तर आपण थक्क होतो, पण त्या लेखांची पुस्तके झाली नाहीत.

मैसूरच्या संस्थेचा आराखडा केळकरांनी तयार केला आणि डॉ० कत्र्यांनी तो पंडित नेहरूंच्या गळी उतरवला. राज्य मराठी विकास संस्थेचा आराखडाही केळकरांनी १९७९मध्ये तयार केला. पण त्याच्या आधारावर एक नवीनच आराखडा तयार करून तो सुधाकरराव नाईक ह्यांच्या गळी उतरवण्याचे काम १९९३मध्ये सरोजिनी वैद्यांनी केले. त्या संस्थेचे पहिले संचालक होण्याबद्दल केळकरांना विचारणा करण्यात आली होती. पण मुंबईत राहण्याची केळकरांची तयारी नव्हती म्हणून ती माळ सरोजिनी वैद्यांच्या गळ्यात पडली. केळकरांचा ज्या पदावर न्याय्य हक्क होता त्या पदावर, प्रभारी संचालक म्हणून का होईना, केळकरांच्याच 'मराठी अभ्यास परिषदे'च्या कार्यवाहांची नुकतीच नेमणूक झाली हा 'काव्यगत आदर्श न्याय' ('पोएटिक जस्टिस') तर नव्हे ना?



**शिस्त, विश्वास, अलिप्तता**

तुम्ही कलाकार असा, विचारवंत असा किंवा शास्त्रज्ञ असा. एकदा एखादी गोष्ट हाती घेतली की तिला संपूर्णपणे वाहून घेण्याची ताकद तुम्हाला कमवावी लागते. जसा गायकाचा रियाज असतो तसा प्रत्येक सर्जनशील व्यक्तीला रियाज करावा लागतो. किंवा वेगळ्या प्रकारे सांगायचे म्हणजे आपल्या साध्याकडे जाण्यासाठी जितकी अवधाने सांभाळावी लागतात त्यांची जाणीव होणे आणि ती झाल्यानंतर स्वत:ला कोणत्याही प्रकारच्या सबबी न सांगता, न जोंबाळता, स्वत:चे लाड न करता तिथे पोचेपर्यंत काबाडकष्ट करणे हीच ती शिस्त. त्याकरता आपल्या कामावर विश्वास, त्याचबरोबर त्यापासून जरा दूर जाऊन विचार करण्याची क्षमता, आपण जितके वाहून घेतो तितकेच अलिप्त राहून आपल्या कामाकडे बघत येणे हे सारे अशोकने अंगी बाणवले होते.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)



अनुक्रमणिका



# संवेदनशील विचारवंत

विजया देव

भारताच्या विद्याक्षेत्रात भाषाविज्ञानाला महत्त्वाचं स्थान मिळवून देणं आणि भाषाविज्ञानाच्या जागतिक नकाशावर भारताचं स्थान निर्माण करणं या कामगिरीत ज्यांचा महत्त्वाचा हातभार लागला त्या डॉ॰ अशोक केळकर ह्यांच्या मौलिक कार्याची दखल घेण्यासाठी म्हणून आम्ही 'भाषा आणि जीवन'चा हा अंक प्रकाशित करत आहोत.

अखंड विद्याव्यासंगात रममाण होणाऱ्या डॉ॰ केळकरांच्या विविध ज्ञानपैलूंचा आलेखच ह्या अंकात काढायचा आम्ही प्रयत्न केला आहे.

डॉ॰ अशोक रा॰ केळकरांचा जीवनकाल १९२९ ते २०१४ असा उण्यापुऱ्या पंच्याऐंशी वर्षांचा आहे. स्वातंत्र्यपूर्व काळ, स्वातंत्र्योत्तर काळ, महाराष्ट्र राज्याची निर्मिती, आणीबाणी आणि नंतरचा काळ आणि काळाला व्यापून राहिलेल्या देशातील विविध घडामोडी ह्यांचे ते सजग साक्षीदार होते. म्हणूनच त्यांनी मांडलेला विचार हा नुसता भाषिक विचार नाही, तर समाजजीवनाला भिडलेला विचार आहे. लोकांच्या प्रत्यक्ष जगण्यातल्या सुखदुःखाशी निगडित आहे. नेपोलियनचा एखादा दाखला ते सहजगत्या देतात. तसंच आपल्या समाजातल्या लोकांविषयी कळवळ्यानं बोलतात. म्हणूनच भाषाशिक्षणाबद्दल बोलताना ते म्हणतात, "...भारतासारख्या अविकसित देशात नुसता पुरवठाच अविकसित असतो असे नाही तर मागणीही अविकसित असते. मागास समाजात मुलांना नुसते दूध किंवा फळे उपलब्ध करून भागत नाही, ती खायलादेखील शिकवावे लागते." अशा ह्या संवेदनशील विचारवंताने भाषाविज्ञान, साहित्यव्यवहार, अनुवाद, कलासमीक्षा, तत्त्वज्ञान ह्या विषयांवर मौलिक लेखन केले आहे. भाषा हे घटितच त्यांना सदैव कुतूहलजनक वाटत आल्यामुळे सैद्धांतिक विवेचन आणि उपाययोजना यांच्यासंदर्भात त्यांनी मराठी, हिंदी, इंग्रजी, फ्रेंच, चिनी, काश्मिरी, वऱ्हाडी, उर्दू अशा अनेक भाषांचा विश्लेषणासाठी उपयोग केलेला आहे. १९६२पासून सत्तावीस वर्षं ते डेक्कन कॉलेजमध्ये भाषाविज्ञानाचे आधी प्रपाठक व नंतर प्रोफेसर होते. डेक्कन कॉलेजातील भाषाविज्ञानाच्या प्रगत केंद्राचे ते संचालकही होते. भाषाविज्ञान शिकवता शिकवता, आपल्या प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष शिष्यांना त्यांच्याकडून मोलाचे धडे मिळाले. त्या ऋणाचं भान ठेवत कृतज्ञतापूर्वक स्मरण करण्याचा हा एक प्रयत्न आहे.

विशाल दृष्टिकोण आणि सखोल ज्ञान देणाऱ्या स्वतंत्र बाण्याच्या या विद्यावंताचं – डॉ॰ अशोक रामचंद्र केळकर ह्यांचं कार्य ह्या अंकातील विविध लेखांमधून वाचकांसमोर उलगडेल.

डॉ॰ केळकरांविषयी इतरांनी लिहिलेले लेख आणि डॉ॰ केळकरांनी लिहिलेले पण ह्यापूर्वी मराठीत प्रसिद्ध न झालेले लेख अशा दोन भागांत हा अंक आपल्यासमोर येत आहे.

मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी अखेरपर्यंत झटणाऱ्या केळकरांना ही आपणां सर्वांची आदरांजली.



**शैलीचा पडताळा**

अशोकच्या लेखनात शैलीबद्दल सैद्धांतिक आणि निरीक्षणवजा असे दोन्ही प्रकारचे मोलाचे विचार आपल्याला वाचायला मिळतात. पण त्याच्या शैलीविषयक विचारांचा पडताळा त्याच्या स्वत:च्या लेखनशैलीत जाणवतो आणि त्याचे गंभीर विचार वाचतानाही सुज्ञ वाचकाच्या चेहऱ्यावर अचानक एक हास्यरेखा चमकून जात असावी असे मला वाटते. उदाहरणार्थ, त्याच्या 'संगीताची भाषा आणि मनोव्यापार' ह्या लेखात 'मनौवैज्ञानिक दृष्टिक्षेप' ह्या रकान्याखालील पहिली ओळ आहे: *तत: प्रविशति मनोवैज्ञानिक:* ! एका वैचारिक लेखात अचानक रंगमंचावरची सूचना आल्यावर जरा गंमतच उडते. तसेच त्याच्या लेखनात अनेकदा जुन्या नाटकात नाटक चालू असताना प्रेक्षकांकडे बघून एखादी ओळ म्हटल्यासारख्या वाचकाला सूचना दिल्या जातात. प्रत्यक्ष संवाद साधला जातो आणि अनेकदा वाचकाची कानउघाडणी केली जाते.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)



# ललितकला आणि प्रयोगक्षम कलाविचार

दीपक घारे

अशोक केळकर भाषाविज्ञानाच्या क्षेत्रातले चिंतनशील विचारवंत आणि अभ्यासक म्हणून ओळखले जातात. भाषाशास्त्र हे मुळातच विविध विद्याशाखांना आणि कलेच्या बहुरूपी आविष्काराला स्पर्श करणारे आहे. त्यात केळकरांसारखा व्यासंगी आणि मर्मग्राही समीक्षक असेल तर कला आणि जीवनाकडे पाहणारा एक सर्वव्यापी दृष्टिकोण त्यात अंतर्भूत असणार हे उघडच आहे. ज्याला आपण ललितकला अथवा प्रयोगक्षम कला (परफॉर्मिंग आर्ट) म्हणतो त्याचा विचार केळकरांनी आपल्या लेखनामधून केलेला आहे. त्यांच्या सर्वव्यापी दृष्टिकोणाचा एक भाग म्हणून ललितकला विचार केळकरांच्या लेखनामधून येतो. पण त्याचा स्वतंत्रपणे विचार करावा इतका तो महत्त्वाचा आहे. ह्याचं कारण असं की, दृश्यकला, संगीत अशा ललितकलांच्या संदर्भात सैद्धान्तिक लेखन मराठीत फारसं झालेलं नाही. विविध कलांमधील निर्मिती आणि आस्वादाच्या पातळीवरचे समान दुवे, आस्वादाच्या पातळीवरचे मूलभूत निकष ह्याबाबतीतही शोधवृत्तीने चर्चा होताना दिसत नाही.

ललितकलांमध्ये केळकरांनी गायनवादन, नर्तन, चित्रकला, मूर्तिशिल्प, वास्तुशिल्प, सुशोभन आणि आरेखन कला, संगीतप्रधान आणि साहित्यप्रधान रंगभूमी तसेच चित्रपट यांचा समावेश केलेला आहे. ह्या सर्वांचं साहित्याशी आणि भाषेशी असलेल्या नात्यांचं स्वरूप शोधण्याचा प्रयत्न केळकरांनी केला आहे. सर्व ललितकलांच्या भाषांना सामावून घेणारा भाषेबद्दलचा एक व्यापक व्यापक दृष्टिकोण त्यातून येतो. केळकर यांचा हा ललितकला विचार 'रुजुवात' ह्या त्यांच्या पुस्तकात आलेला आहे. तो स्थूल आणि सूक्ष्म अशा दोन्ही पातळ्यांवरचा आहे. केळकरांनी विवेचनाची पूर्वतयारी म्हणून एक संकल्पनात्मक नकाशा मांडलेला आहे. भाषा, साहित्य आणि कला ह्या विषयांवरील समीक्षात्मक चिंतनाचा परिसर ह्या व्यापक आणि दिशादर्शक नकाशामध्ये येतो. हा झाला स्थूल विचार. दुसऱ्या बाजूला दृश्यकला, संगीत, नृत्य अशा कलांच्या विशिष्ट रूपाबद्दल चर्चा केलेली आहे. पुनरुज्जीवनकाळ (रेनेसान्स) आणि प्रबोधनकाळ अशी कालविशिष्ट मीमांसाही केली आहे. हा सूक्ष्म विचार म्हणता येईल.

विवेचनाच्या दृष्टीने ललितकलांचा त्या त्या कलांच्या संदर्भात अथवा कालखंडाच्या संदर्भात केलेला विचार आधी पाहणं सोयीचं ठरेल.

केळकरांनी भारतीय ललित कलांसंबंधी लिहिताना कलांची चार गटांत[१] विभागणी केलेली आहे.

१. गायनवादन, नर्तन आणि यांच्या अधीन असलेली रंगभूमी
२. चित्रकला, मूर्तिशिल्प आणि वास्तुशिल्प
३. सुशोभनकला आणि आरेखनकला (डिझाइन आर्ट्स) आणि व्यावसायिक चित्रपटासारख्या मनोरंजनकला
४. काव्य, कथावाङ्मय, गद्यवाङ्मय आणि साहित्यप्रधान रंगभूमी आणि चित्रपटकला.

बरोक किंवा रोमँटिक कलेमधील नृत्य, साहित्य, संगीत कलांची एकरूपता किंवा प्राचीन भारतीय कलांची ईश्वरी उपासनेत होणारी समरसता भारतातल्या आधुनिक कलासाधनेमध्ये दिसत नाही. प्रबोधन काळातील भारतीय कलांचा हा भंगलेला इतिहास केळकरांनी चार तुकड्यांमध्ये विभागलेला आहे. ही विभागणी अर्थातच केळकरांनी आपल्या विवेचनाच्या सोयीसाठी केलेली आहे.

पुनरुज्जीवनकाळ (रेनेसान्स) आणि भारतातील आधुनिक युग यांच्यातला एक महत्त्वाचा फरक केळकरांनी नोंदवलेला आहे. तो म्हणजे युरोप आधुनिक युगाशी येऊन पोचणं ही आतून उपजलेली क्रिया आहे, तर आधुनिक युग दक्षिण आशिया ह्या उपखंडापर्यंत येऊन पोचणं ही बाहेरच्या प्रेरणेमुळे घडलेली क्रिया आहे. त्यामुळे युरोपातल्या परिवर्तनाची खोली आणि उंची भारतीय प्रबोधनाला लाभलेली नाही. केळकर म्हणतात की, लिओनार्दो दा व्हिंची सारखा 'रेनोसान्स' पुरुष किंवा ग्योटेसारखा 'एन्लायटनमेंट' पुरुष हा भारतामध्ये अभावानेच तळपतो. नाही म्हणायला राजा राममोहन रॉय, न्यायमूर्ती रानडे, रवींद्रनाथ टागोर आणि महात्मा गांधी ह्या चार व्यक्ती जीवनाच्या सर्व अंगांना स्पर्श करणाऱ्या म्हणून पुनरुज्जीवनकाळातल्या प्रेरणेजवळ काही प्रमाणात पोचू शकतात. चित्र शिल्पकलेच्या दृष्टीने आधुनिकतेचं हे उपरेपण अधिकच नजरेत भरतं. केळकरांनी चित्रकलेच्या बाबतीत ह्या मुद्यावर चर्चा केलेली आहे. ती अगदी थोडक्यात असली तरी आधुनिक भारतीय चित्रकलेच्या वर्मावर बोट ठेवणारी आहे.

केळकर म्हणतात, चित्रकला, मूर्तिशिल्प आणि वास्तुशिल्प ह्या कला म्हणजे समाजाच्या लेखी केवळ निरक्षरांची कारागिरी. (नाही म्हणायला गोपुरम् बांधणाऱ्या दाक्षिणात्य स्थपतींना काही प्रतिष्ठा होती.) त्यांची वर्णी उच्च सांस्कृतिक जीवनात लागली ती ब्रिटिशांच्या पुरस्काराने निघालेल्या कलानिकेतनांच्या आणि सरकारी

आश्रयाच्या मार्फत. पण त्यामुळे झाले काय की ह्या कला व्हिक्टोरियाकालीन पढीक कलेच्या (ॲकडेमिक आर्ट) सावटात आल्या आणि त्यांना भारतीय कलासंचिताचा जीवनरस मिळेनासा झाला. ह्याला अपवाद म्हणून चार्ल्स मॅलेट आणि भारतीय कलेबद्दल आस्था असलेले ग्रिफिथ यांचा उल्लेख केळकरांनी केला आहे. पण बॉम्बे रिव्हायव्हलिस्ट चळवळीचे प्रणेते (जे॰जे॰चे प्रिन्सिपल) ग्लॅडस्टन सॉलोमन यांचा उल्लेख केळकरांनी केलेला नाही. समाजाच्या अभिरुचीला वळण देणारे दोन प्रयत्न म्हणून केळकरांनी बेंगॉल स्कूलचा आणि राजा रविवर्मा ह्यांचा उल्लेख केलेला आहे. बॉम्बे स्कूलचा उल्लेख आलेला नाही. पण ॲकडेमिक आर्टला पढीक कला असा जो शब्द केळकरांनी योजला आहे तो समर्पक आहे. ॲकडेमिक म्हणजे यथार्थवादी चित्रण हा रूढ अर्थ झाला. पण पढीक शब्दातून शिक्षणक्रमामधून आलेली, चाकोरीबद्ध, अंतःप्रेरणेपेक्षा तंत्रकुशलतेला महत्त्व देणारी असा जो अर्थ सूचित होतो तो बॉम्बे स्कूलच्या ॲकडेमिक शैलीला तंतोतंत लागू पडतो. राजा रविवर्मा ह्यांच्या बाबतीत युरोपीय बरोक रंगफलक आणि कुंचला यांचा केळकरांनी उल्लेख केलेला आहे. बरोक शैली ही पुनरुज्जीवनकाळानंतरची आणि नाट्यात्मता, अलंकरण आणि उत्कटतेकडे झुकलेली शैली मानली जाते. पण बर्निनीच्या शिल्पकलेच्या तुलनेत रविवर्मा ह्यांची चित्रे उपरी आणि व्याजनाट्यात्म वाटतात. अमृता शेर-गिल यांची नवचित्रकला इतरांच्या हातून पढीक नवचित्रकला बनली. मूर्तिशिल्प आणि वास्तुशिल्प यांची गती तर अधिकच मंद राहिली. कलेतील खऱ्याखुऱ्या नवतेचे आव्हान कधी पेलले गेलेच नाही. ब्रिटिशांच्या राजाश्रयातून आपण मनाने सावरलोच नाही, अशी टीकाही केळकरांनी केली आहे. व्हिक्टोरियन चित्रकलेच्या संस्कारांमुळे शिल्पकला स्मारकशिल्पांपलीकडे फारशी गेली नाही. म्हात्रे, तालीम आणि करमरकर यांच्यानंतर स्मारकशिल्पांचं गुणात्मक अवमूल्यनच झालेलं दिसतं. भारतीय समाजावर बाहेरून लादल्या गेलेल्या प्रबोधनाच्या प्रेरणा हे भारतीय आधुनिक कलेच्या दुर्बलतेचं कारण असल्याचं केळकरांनी सांगितलं आहे. भारतीय आधुनिक चित्रकलेबद्दल आत्मगौरवाने बोललं जातं. जागतिक कलेच्या तुलनेत आपण कुठे आहोत आणि का आहोत ह्याबद्दल मौन पाळलं जातं. खरं तर अशा परखड चिकित्सेची गरज आहे आणि केळकरांनी ती केलेली आहे.

भारतीय ललितकलांचा तिसरा गट केळकरांनी केलेला आहे तो सुशोभनकला, आरेखनकला आणि मनोरंजनकला यांचा. ह्या कलाच मुख्यतः सर्वसामान्य समाजाची अभिरुची घडवीत असतात. अभिजात कलांशी ह्या कलांचं कधी विरोधपूर्ण तर कधी जवळचं नातं असतं. केळकरांनी ह्या कलांमध्ये विपरीत अंतर्विरोधांची एक मालिकाच असल्याचं सांगितलं आहे. तिन्ही कलांचं भारतीय संचित मातबर. पण ते सगळं मोडीत निघून ह्या कला भावहीन अभिरुचीच्या

आरेखनकला म्हणजे डिझाइन असं अपेक्षित आहे. मात्र ह्या आरेखनकलांची नेमकी व्याप्ती त्यांनी स्पष्ट केलेली नाही.

भारतीय परंपरेत शिष्टकला आणि लोककला, उच्चभ्रू आणि निम्नभ्रू कला य़ांचं सहजीवन होतं. कलेच्या क्षेत्रातील व्यापारीकरणामुळे चित्र पालटलं आणि अभिजनांची कला आणि लोककला यांच्यामध्ये दुरावा निर्माण झाला. व्यापारीकरणाबरोबर ह्याला आणखीही एक कारण होतं. जे॰जे॰मध्ये ब्रिटिश पद्धतीचं कलाशिक्षण सुरू करण्याचा प्राथमिक उद्देश कारागिरीला उत्तेजन देणं हा होता. पण पुढे अभिजात कलेच्या शिक्षणाला महत्त्व आलं आणि कारागिरीतून आलेल्या वस्तूंना आणि कारागिरांना दुय्यम स्थान लाभलं. भारतीय कारागिरीशी असलेला संबंधही तुटला. विविध प्रकारच्या भांड्यांवरचं नक्षीकाम, वास्तुकलेतील अलंकरण यांसारख्या सुशोभनकलेत मोडणाऱ्या वस्तूंची कलात्मकता आणि कौशल्यं लोप पावली आणि यांत्रिकीकरणामुळे सुशोभनकलेला एक प्रकारचा उठवळपणा आला. अभिजात कला आणि सुशोभनकला यांच्यात संवाद राहिला नाही.

आरेखनकला म्हणजे डिझाइन आर्ट्सबद्दल जाता जाता सांगायला हवं. डिझाइन आणि ग्राफिक आर्ट ह्या संकल्पनांचा अभिजात आणि उपयोजित म्हणजेच सुशोभनकलांशी जवळचा संबंध आहे. ग्राफिक आर्ट म्हणजे मुद्रणयोग्य कला. त्यात ड्रॉइंग्ज, मुद्राचित्रे, पुस्तकांमधली कथाचित्रे, जाहिराती ह्या सगळ्यांचाच समावेश होतो. डिझाइन म्हणजे संकल्पन. दृश्य आकारांच्या मांडणीला भाषा आणि समाज यांचं एक व्यापक अधिष्ठान प्राप्त करून देणं व दृश्य आकार, भाषा, इतिहास आणि संस्कृती यांच्यातील नाती प्रस्थापित करणं म्हणजे संकल्पन. त्यामुळे शिक्षण, व्यवस्थापन अशा मूलभूत गोष्टींपासून व टूथब्रशपासून ते मोटारीपर्यंतच्या उपभोग्य वस्तूंच्या डिझाइन्सपर्यंत अनेक जीवनस्पर्शी घटकांना डिझाइन स्पर्श करतं. समाजाच्या अभिरुचीचा, तिच्या पातळीचा विचार करताना डिझाइन आणि ग्राफिक आर्टचा सविस्तरपणे विचार करणं गरजेचं आहे. केळकरांच्या आराखड्यात आरेखनकलेला ओझरता स्पर्श केलेला आहे. पण त्याबद्दल अधिक चर्चा होणं आवश्यक आहे.

## २

अशोक केळकरांनी नाटक आणि नृत्य ह्यासंबंधी विवेचन करताना काळ आणि अवकाश ह्या महत्त्वाच्या घटकांची मीमांसा केली आहे. कलाकृती ही स्थिर वस्तू नसून तिची निर्मिती, असतेपण आणि आस्वाद यांमध्ये तिचं स्वरूप बदलत असतं, तिच्या ह्या स्वरूपाची चर्चा फारशी कधी होत नाही. केळकरांनी ती केलेली आहे. आणि नाटक, संगीत यांसारख्या प्रयोगक्षम कलांप्रमाणेच कवितेच्या आणि

साहित्याच्या प्रांतातही काळ आणि अवकाश हे घटक कसे कार्यरत असतात ते सांगितलं आहे. नाटक हे वस्तूपेक्षा एक क्रियास्पंद आहे. घटना आहे. तसेच नर्तन आणि संगीत ह्या काळ व्यापणाऱ्या कला आहेत. नाटक ही वस्तू नाही. ते होणे आहे. नाटक घडताना त्याच्यावर अनेक माणसं कमीअधिक सर्जकपणे आपापल्या भूमिकांनुसार काम करतात. त्याद्वारे बीजारोपणापासून प्रस्तावनेपर्यंत आणि नंतर उलट दिशेने अभिज्ञानापासून चर्वणेपर्यंतचा प्रवास घडवतात. नाटकाचे पाठ्य (संहिता), त्याचं सादरीकरण सारखं असलं तरी दर वेळच्या नाट्यप्रयोगात नवनिर्मितीला थोडातरी वाव असतोच. संगीताचंही तसंच आहे. केळकरांच्या म्हणण्यानुसार अवस्थांतरातून नाटक पुढे जातं. ते नाकासमोर पुढे न जाता मळसूत्राच्या आट्यांवरून वाटोळे पुढे सरकतं.

नाटकाच्या प्रत्येक अवस्थेत कमीअधिक मात्रेने चार कार्ये पुरी व्हावी लागतात. केळकरांनी सांगितलेली ही कार्ये अशी –

१. बी पडणे (बीजारोपण) / धुमारे फुटत राहणे (चर्वण)
२. आकार धरणे (अभिव्यंजन) / आकार समजून घेणे (आकलन)
३. वठणे (क्षेपण) / रिघणे (अंतःक्षेपण)
४. उभे करणे (प्रस्तावन) / ओळख पटणे (अभिज्ञान)

ही चार कार्ये नाटकाच्या कर्त्याने करायची आणि दुसऱ्या बाजूला पाहणाऱ्या रसिकाने म्हणजेच ग्रहणकर्त्याने करायची अशा जोड्यांमध्ये विभागलेली आहेत. ह्या दोघांच्या सहभागातून नाटक काळ आणि अवकाशाच्या चौकटीत आकाराला येतं. बीजारोपण आणि अभिव्यंजना होते म्हणजे मूळ नाट्यकृतीला ती सादर होताना पोषक अशा कल्पना, प्रतिमांचं, तपशिलांचं बळ मिळतं आणि बीजाला कोंभ फुटतात. नाट्यकृतीला एक परिपूर्ण वास्तवदर्शी रूप प्राप्त होतं आणि त्या रूपाला आस्वाद्यता प्राप्त होते. ह्या चारही अवस्था रसिकाच्या सहभागाशिवाय शक्य नसतात. ग्रहणकर्त्याच्या ठिकाणी प्रस्तावन[२] (नाट्यकृतीचं परिपूर्ण रूप) ह्याला पूरक अभिज्ञान (नाट्यकृतीची ओळख पटणं) ही क्रिया घडते. क्षेपणाला पूरक अशी अंतःक्षेपणाची (नाट्यकृतीचा आशय मनामध्ये रिघण्याची) क्रिया व्हावी लागते, अभिव्यंजनाचा आकार आणि आवाका लक्षात आला की नाट्यबीजाला असलेल्या संभाव्य अर्थच्छटांची चर्वणा अथवा उजळणी सुरू होते. अर्थाला नवे धुमारे फुटतात.

नाट्यरूपाचा केळकरांनी केलेला हा विचार काळ हा घटक लक्षात घेऊन केलेला आहे. तो अनेक स्तरांवरचा आणि गुंतागुंतीचा असला तरी नाटकाचा सर्व बाजूंनी विचार करणारा आहे. दुसरं असं की साहित्य, संगीत, दृश्यकला, नृत्य अशा सर्वच कला त्यात असल्यामुळे एकूण ललितकलांचा रूपविचार त्यात सविस्तरपणे येतो.

संगीताबद्दल आणि त्याच्या अभ्यासाबद्दल केळकरांनी अशाच काही नव्या दिशा सुचवल्या आहेत. संगीत हा भाषेप्रमाणे एक मानवी व्यवहार आहे. त्याचा मानसिक, सामाजिक, सांस्कृतिक इत्यादी अंगांनी अभ्यास झाला पाहिजे असं ते सांगतात. संगीताची सर्जनक्षमता आणि ग्रहणक्षमता यांचा अभ्यास करताना मनोविज्ञानाची मदत घेणे त्यांना सयुक्तिक वाटतं. ध्वनिगुण आणि संगीतातले त्याच्यामार्फत गोचर होणारे विविध आकार ह्यांचा अन्वय लावणं, संगीतकाराच्या व्यापारात जाणीवपूर्वक जोपासलेल्या कलेचा भाग किती आणि सहजपटुत्वाचा भाग किती, कंठगत गायन आणि बासरीवर ऐकू येणारी अक्षरं, तोम् ता ना सारखी सांकेतिक अक्षरं, दिड् दा सारखे बोल ह्या अक्षरांचं ध्वनिस्वरूप निश्चित करणं, स्वर, लय ह्यांच्या जोडीने ह्या अक्षर-योजनेचा आस्वाद्यतेतला सहभाग निश्चित करणं, अशा अनेक प्रश्नांची उत्तरं शोधणं केळकरांच्या दृष्टीने महत्त्वाचं आहे.

'नृत्य, कथक आणि रोहिणी भाटे' ह्या लेखात[३] नृत्यकलेविषयी विवेचन आलेलं आहे. नर्तन म्हणजे सर्वांना दिसावी अशी शरीराची हालचाल. शरीरापेक्षा इथे शरीराची स्थळ-काळाला व्यापणारी हालचाल महत्त्वाची. नर्तनाला संगीत पूरक ठरतं. पायाचा ठेका, घुंगरू व टिपरीचा ताल हा काळाची जाणीव करून देतो. संगीताप्रमाणेच नृत्यातलं कथन हेसुद्धा निमित्तरूप असतं. शरीराच्या हालचाली, संगीत, कथानक ही सगळी साधनं आहेत. त्यातून नृत्याला काहीतरी आशय सांगायचा असतो. ह्या दोन्हीच्या संयोगातून माध्यम निर्माण होतं आणि एका विश्वाची निर्मिती होते.

३

अशोक केळकरांनी ललितकला अथवा प्रयोगक्षम कलांबद्दल, त्यांच्या होतेपणातल्या बारकाव्याबद्दल विस्ताराने आणि विविध स्तरांमधल्या गुंतागुंतीची सुलभपणे उकल करत लिहिलं आहे. त्याचं एक ढोबळ रूप आपण पाहिलं. प्रत्येक कलेची मीमांसा करताना त्या कलेच्या रूपाबद्दल, शैलीबद्दल, आशयाबद्दल काही विशिष्ट संकल्पना असतात, अथवा काही संकल्पना अथवा पारिभाषिक शब्द सर्व कलांना लागू पडणाऱ्या पण कलेनुसार त्यांना विशिष्ट संदर्भ असणाऱ्या असू शकतात. 'रुजुवात'मधलं केळकरांचं लेखन एकतर ललितकलांबद्दल अशा काही संकल्पनांची रुजुवात करणारं – म्हणजेच प्रथमच अशा संकल्पना रुजवणारं किंवा प्रचलित संकल्पनांना कधी नेमका तर कधी नवा अर्थ देणारं – आहे. त्यामुळे प्रयोगकलांची मीमांसा करण्यासाठी जसा त्यांचा उपयोग होईल तसाच विविध कलांमधील तुलनात्मक मीमांसा करण्यासाठी ह्या संकल्पना महत्त्वाच्या आहेत. म्हणूनच त्या जरा सविस्तरपणे पाहू या.



अनुक्रमणिका

## कलेतील काळ आणि अवकाशाचे परिमाण

काळ आणि अवकाशाचे परिमाण प्रत्येक कलेत असतं. साहित्यात कथनात्मक अवकाश असतं, नाटकात रंगमंचाच्या चौकटीत ते बंदिस्त असतं. संगीत आणि नर्तनाच्या बाबतीत ते लयबद्ध आणि पुनरावर्तित असतं. ह्याशिवाय वाचक, प्रेक्षक किंवा नाट्यग्राहक ह्यांच्या मनोरंगभूमीवर नाटकाचा प्रयोग रंगतो ते अवकाश पुन्हा वेगळंच असतं. अवकाश हे मुळात अमर्याद असतं, पण ते आकलनाच्या कक्षेत आणायचं तर त्याचं विभाजन करावं लागतं, वस्तुरूप आकाराच्या संदर्भात त्याची परिमाणं ठरवावी लागतात. दैनंदिन व्यवहारात काळ आणि अवकाशाची जाणीव आपल्याला होते पण ती मर्यादित स्वरूपाची आणि चाकोरीबद्ध असते. कलेतील काळ आणि अवकाशाची जाणीव ही अधिक व्यापक आणि एक वेगळी अनुभूती देणारी असते.

काळ आणि अवकाश ह्याचा संगीताशी असलेला संबंध आणि त्याच्या स्वरूपाबद्दल अन्य अभ्यासकांनीही लिहिलेलं आहे. लय-तालाचा मूलभूत विचार डॉ॰ शरच्चंद्र विष्णू गोखले ह्यांनी 'लय ताल विचार' ह्या ग्रंथात केलेला आहे. कोणतंही संगीत ही एक स्थिरवस्तू नसते. ती एक क्रियापरंपरा असते. संगीताचं गतिशास्त्र ठरलं की त्यावर कला, सौंदर्य, मनोभावना यांचा डोलारा उभारता येईल असं त्यांचं मत होतं. संगीताची गती शोधताना भौतिक, शारीरिक आणि मानसिक, नादशास्त्र, उच्चारशास्त्र, व्याकरण, छंदशास्त्र अशा संबंधित शास्त्रांचा गोखलेंनी उल्लेख केलेला आहे[४]. डॉ॰ अशोक दा॰ रानडे ह्यांनी संगीतातल्या काळ आणि अवकाशाचं स्वरूप सांगताना अवकाशाचे तीन भाग पाडलेले आहेत. आकाश (निसर्गशक्ती आणि काळ), अवकाश, (लांबी-रुंदीसारखं) भौगोलिक परिमाण आणि विशिष्ट काळाशी नाते असलेली कालिकता आणि रंगावकाश (संस्कारित, प्रयोगनिर्मित घडामोड म्हणजेच लय). संगीत आणि नाट्य हे रंगावकाशात येतं. कारण रानडे यांच्या मते, संगीत किंवा कुठचीही कला म्हणजे संस्कारित कलात्मक आणि कृत्रिम वास्तव असतं. ध्वनी हा आकाश ह्या मूलतत्त्वाचा भौतिक गुण आहे आणि तो संगीत व भाषा ह्यांचा मूलभूत घटक आहे. ध्वनियुक्तता (शब्द), निःशब्दता आणि स्वर ही संगीताची मूलतत्त्वं आहेत. दृश्यकलेत आकार/अवकाश एकत्र आल्याशिवाय आकार दृश्यमान होत नाही. त्याप्रमाणे निःशब्दता असल्याशिवाय ध्वनीची जाणीव होत नाही. निःशब्दता आणि ध्वनिपूर्णता ह्यांतून एक लयबंध निर्माण होतो[५].

काळ आणि अवकाश ह्यांची इतर अभ्यासकांनी केलेली मांडणी लक्षात घेतली की केळकरांचा विचार कळण्यास मदत होते आणि त्यांनी केलेला ह्या संकल्पनांचा विस्तार आणि त्याचे विविध स्तर लक्षात येतात. काळ आणि अवकाश ह्याबद्दल

सांगताना केळकर म्हणतात, की संगीत केवळ काळ व्यापत नाही तर ते ऐकणाऱ्याला काळाची जाणीव तऱ्हेतऱ्हेने करून देते. आस्वादगुणांमध्ये कलाकारांचं आणि श्रोत्यांचं शिक्षण आणि संस्कारसंचित येतं, तर संगीताच्या ध्वनिगुणांमध्ये द्रुत, मध्य, विलंबित लय; मंद्र, मध्य, तार सप्तक इत्यादींचा समावेश होतो. ह्यात जसा काळाचा संदर्भ आहे तसाच लय (ऱ्हिदम) संकल्पनेचं विश्लेषण करताना पुनरावृत्ती व ह्या पुनरावृत्तीची कालसापेक्ष बोधना (स्वरांची आवर्तने समेवर येणे) ह्याबद्दल केळकरांनी लिहिलं आहे.

रोहिणी भाटे आणि कथक नृत्य ह्याबद्दल केळकर सांगतात की नर्तन म्हणजे शरीराची हालचाल, शरीराचं चलनवलन. नर्तकाची स्थिर अवस्था म्हणजे चलनवलनात घेतलेला एक विराम असतो. नर्तनामध्ये स्थळकाळ व्यापणारी हालचाल असते. नर्तनाचे प्रमुख साधनद्रव्य म्हणजे मानवी शरीराचं दृश्य आणि पाहणाऱ्याला सहकंपित करणारं चलनवलन. नर्तन ही काळ व्यापणारी कला आहे. नर्तनाचा काळ अंकित करायला संगीताची मदत होते. नर्तनाचं साधनद्रव्य म्हणजे प्रेक्षकाला सहकंपित करणारं नर्तकाच्या शरीराचं चलनवलन. ह्या साधनामुळे आशयाला रूप मिळतं. नर्तनाचं एक माध्यम असतं. ह्या माध्यमात साधनद्रव्य आणि आशयद्रव्य एकत्र होतात. आणि ह्यातून एक दुनिया उभी राहते. नर्तनातून घडलेल्या ह्या विश्वाला लयबद्ध काळाचं परिमाण असतं. तसंच स्थळाचंही परिमाण असतं. हे विश्व म्हणजे एक प्रांगणच असतं. नर्तनाच्या अंगणात लयबद्ध अशा काळात प्रेरणांचं कार्य चालू असतं. ह्या प्रेरणा विविध प्रकारच्या असतात. प्रेरणांचा खेळ कधी समान दिशेने, कधी परस्परविरुद्ध दिशेने तर कधी एकमेकांना चाटून असा चालतो. लय, प्रांगण आणि प्रेरणा ह्यांनी मिळून नर्तनाचं माध्यम बनतं. नर्तननिर्मिती विश्व हा शक्तीचा प्रतिभास असतो. केळकरांनी लय, प्रांगण आणि प्रेरणा ह्या संज्ञांचा वापर केलेला आहे. ह्यातला प्रांगण हा शब्द महत्त्वाचा आहे. ह्यापुढे जाऊन ते असं म्हणतात की कथक ही मुक्तता आणि व्यवस्था यांच्यामधला ताणतणाव पेलणारं असं जीवनरूप आहे.

केळकरांच्या 'प्रांगण' तसेच 'मुक्तता आणि व्यवस्था' ह्या संज्ञांकडे येण्यापूर्वी रोहिणी भाटे ह्यांनी संरचना (कोरिओग्राफी) ही संज्ञा त्यांच्या 'लहजा' पुस्तकात मांडली आहे ती जाणून घ्यायला हवी. केळकरांनी संरचनेबद्दल लिहिलेलं नाही पण त्यांच्या प्रांगण ह्या संज्ञेत संरचना अंतर्भूत आहे कारण संरचना ही अवकाशाचीच एक वेगळी मिती आहे. स्थल (अवकाश), काळ आणि ऊर्जा किंवा चैतन्य ही संरचनेची मूलतत्त्वं आहेत. नर्तन हे दृश्यकाव्य असल्यामुळे रोहिणी भाटे ह्यांच्या मते ज्या अवकाशात नर्तनाचा चैतन्यशील संचार असतो, त्या अवकाशाच्या तीन मितींचा,





अनुक्रमणिका

दिशांचा, पातळ्यांचा आणि त्याच्या सर्वसमावेशक परिणाम मोजणाऱ्या घनतेचा, म्हणजेच लांबी, रुंदी आणि उंचीचा समावेश त्यात होतो. घनता हा अवकाशाचा अत्यंत तरल असा सर्वसमावेशक गुण आहे. मिती, दिशा, पातळ्या ह्या सर्व पैलूंचा एकत्रित विचार घनतेमध्ये येतो. रंगमंचावरील नर्तकांच्या संख्येनुसार आणि आकृतिकल्पानुसार घनतेचं स्वरूप निश्चित होतं.

कालतत्त्वाबद्दल रोहिणी भाटे ह्यांनी सांगितलं आहे की पाश्चात्य संगीतातला आणि नर्तनातला कालविचार समानच आहे. भारतीय संगीतात काळ हा भावभावनांच्या आविष्काराचं साधन म्हणून येतो. नैसर्गिक लय (टायमिंग ह्या अर्थाने) सुबद्ध लय (बीट ह्या अर्थाने), छंद म्हणून लयवाक्यांच्या स्वरूपात, तालाच्या प्रगल्भ स्वरूपात काळ विविध रूपांनी व्यक्त होतो. संगीत हे ऐकणाऱ्याला काळाची जाणीव तऱ्हेतऱ्हेनं करून देतं असं केळकर म्हणतात. त्याचं स्पष्टीकरण रोहिणी भाटेंच्या ह्या विधानामध्ये मिळतं[६].

केळकरांनी अवकाश, काळ आणि ऊर्जा ह्यांना समांतर असे प्रांगण, लय आणि प्रेरणा हे माध्यमाचे घटक सांगितले आहेत[७]. प्रांगण ह्या संज्ञेमुळे कलावस्तूभोवतालचा परिसर सूचित होतो. नृत्य असो, नाटक असो वा शिल्प, नृत्याच्या सचेतन आकारामुळे अथवा शिल्पबद्ध आकाराच्या भौतिक अस्तित्वामुळे भोवतालचा परिसरही मंत्रभारित होतो. त्याचा पैस ग्राहकाच्या आकलनक्षमतेनुसार कमीअधिक आणि लवचीक असतो. त्याचा अचूक भावार्थ प्रांगण ह्या शब्दात आहे. प्रांगण ह्या संज्ञेच्या जवळपास येणारी संकल्पना द॰ग॰ गोडसे ह्यांनी 'ऊर्जायन' ह्या पुस्तकात मांडली आहे. 'आविष्कारांतर्गत अवकाश म्हणजे कोणत्यातरी भावाने व्याप्त असलेले अथवा भावाचा प्रभाव असलेले पार्थिव-अपार्थिव क्षेत्र!' हे अवकाश भौमितिक तालमानाचे नसल्यामुळे ते लवचीक असते. म्हणजे संदर्भानुसार ते सूक्ष्म अथवा व्यापक होऊ शकते. आविष्काराची प्रेरणा देणाऱ्या ऊर्जेचा प्रभाव आविष्काराच्या अवकाशावर प्रत्यक्षपणे असतो तसा आविष्काराच्या आसमंतातील अवकाशावरही अप्रत्यक्षपणे असतो असं गोडसे सांगतात[८].

### मुक्तता आणि व्यवस्था[९]

हीसुद्धा एक महत्त्वाची संज्ञा आहे. प्रत्येक कलेमध्ये ह्या दोन्हीचा समतोल आवश्यक असतो. कलाकृतीत चैतन्य यायचे तर मुक्तता हवी पण स्वैरता नको. रूपसौंदर्य साकारायचे असेल तर व्यवस्था हवी पण ती यमनियमांनी बंदिस्त नको. अशोक दा॰ रानडे ह्यांनी म्हटल्याप्रमाणे 'खरे कलास्वातंत्र्य म्हणजे आपल्याला कोणते निर्बंध हवेत ते आपणच स्वतः ठरविण्याचे स्वातंत्र्य होय.' केळकर सांगतात की कथक म्हणजे व्यवस्थेच्या परिघात जोपासली गेलेली मुक्तता आहे, कधी

मुक्ततेला वाव देणारी व्यवस्था आहे. मुक्तता आणि व्यवस्था यांच्यामधला ताणतणाव पेलणारं ते जीवनरूप आहे. ही मुक्तता आणि व्यवस्था साहित्यात, चित्रकलेतदेखील असते. साहित्यप्रकार, छंदोबद्ध काव्यरचना ह्या व्यवस्थाच आहेत. पण लेखक अथवा कवी कधी कधी ह्या व्यवस्थांना डावलून मुक्ततेला प्राधान्य देतो. आणि त्यातून काहीतरी नवीन घडतं. चित्रकलेत व्यवस्था ही चित्रफलकावरच्या आराखड्याच्या (ग्रिड) स्वरूपात असते. चित्रकार ती व्यवस्था सांभाळून कधी व्यवस्थेच्या कक्षेबाहेर जाऊन मुक्त आविष्कार करतो. अवकाशाचं उभ्या आडव्या रेषांनी केलेलं विभाजन ही एक आधारभूत व्यवस्था आहे. तिचा मुक्तपणे वापर कसा करायचा हे चित्रकाराचं कौशल्य आहे.

### कलाद्रव्य, कलामाध्यम आणि शैली

कलाद्रव्य (मटीरिअल), कलामाध्यम (मीडिअम) आणि शैली (स्टाइल) ह्यांच्या व्याख्यांमध्ये बरेचदा गोंधळ होतो. केळकरांनी ह्याबद्दलही 'रुजुवात'मध्ये विवेचन केलेलं आहे. फलक आणि जलरंग, तैलरंग ह्यासारखे रंगद्रव्य म्हणजे चित्रकलेचं द्रव्य तर रंग, रंगछटा, पोत आणि रेषा हे चित्रकलेचं माध्यम आहे. मूर्तिशिल्पाचं द्रव्य म्हणजे खोदण्याजोगा (दगड), ओतण्याजोगा (धातू), घडविण्याजोगा पदार्थ (माती) आणि घनाकार व पोत हे माध्यम आहे. साहित्याचं कलाद्रव्य भाषा हे आहे आणि रसिकाच्या अनुभवविश्वात आपल्या साऱ्या सामर्थ्यानिशी कल्लोळ उडवून देणारा, वळण लावणारा समग्र भाषाव्यवहार हे साहित्याचं माध्यम आहे.

मर्ढेकरांच्या म्हणण्याप्रमाणे 'शब्द हे – नाद आणि अर्थ ह्या दोन्ही अंगांच्या दृष्टीने – काव्याचे माध्यम नाहीत. शब्द म्हणजे काव्यात्मक भावनाप्रधान अर्थ असे जर समजले तरच शब्दांना काव्याचे माध्यम म्हणता येईल.' ह्याउलट, रूढ अर्थ (रेफरेन्शल) आणि भावनाप्रधान अर्थ (इमोटिव्ह) ह्यांच्यामधील रेषा हीच द्रव्य आणि माध्यम ह्यांच्यामधील सीमारेषा आहे असं मर्ढेकर मानतात, ते केळकरांना मान्य नाही. केळकर रूढ अर्थ आणि भावनात्मक अर्थ पाठ्याच्या पातळीवरचे म्हणजे कलाद्रव्याच्या पातळीवरचे मानतात. श्रव्य-दृश्य-व्याकरणीय अशा अर्थसंक्रमण करणाऱ्या साऱ्या सामग्रीनिशी ही भाषा रसिकाच्या दिमतीला येते तेव्हा, द्रव्यरूप भाषेचं कलामाध्यमात रूपांतर होतं. केळकरांनी 'समग्र भाषाव्यवहारा'ला माध्यम म्हटलं आहे ते ह्या अर्थाने[१०].

शैली म्हणजे कर्त्याच्या विशिष्ट व्यक्तित्वाशी सुसंगत, व्यक्तित्वाचा आविष्कार ठरणारी भाषासरणी. शैलीच्या जवळपास येणारे शब्द म्हणजे रीती, तंत्र हे आहेत. वादनाचा 'बाज', चित्रकलेचं कलम, गायनाचं घराणं हे शब्दही शैलीचाच आशय थोड्याफार फरकाने व्यक्त करतात. केळकरांच्या मते शैलीचा विचार हा

भाषाविज्ञानाची उपशाखा म्हणून न करता तो समीक्षेसारख्या जात्या वादग्रस्त संकल्पना आणि मूल्यविवेक यांच्या संदर्भात केला पाहिजे. तसा त्यांनी तो केलेलाही आहे. साहित्यातला शैलीविन्यास दोन अंगांनी उभा राहतो. 'घडण' (स्ट्रक्चर) हे त्याचं स्थूल अंग आणि 'जडण' (टेक्स्चर) हे त्याचं सूक्ष्म अंग. अलंकार, लय, प्रतिमा ही सारी जडणीची उपांगे आहेत, तर कथानक, पात्रे, वातावरणनिर्मिती ही घडणीची. ह्या जडण-घडणीतून शैलीचा विकास होतो. ललितकलांनाही शैलीविन्यासाची उपपत्ती थोड्याफार फरकाने लावता येईल[११].

४

ललितकला आणि प्रयोगक्षमकला ह्याबद्दल केळकरांनी केलेल्या मीमांसेचं हे स्वरूप आहे. हे विचार ललितकलांची समीक्षा आणि सिद्धान्तन करण्याच्या बाबतीत दिशादर्शन करणारे आहेत. साहित्यासारख्या शब्दप्रधान कलेच्या मीमांसेमधला एकारलेपणा घालवून सर्वच कलाव्यवहाराचा, इतकेच नव्हे तर कला आणि प्रत्यक्ष जीवनाचा समग्र दृष्टिकोण त्यात आहे. आस्वादव्यापाराविषयीच्या लेखामधला केळकरांचा पुढील परिच्छेद त्यांची सर्वसमावेशक भूमिका साररूपाने मांडणारा आहे.

'कलास्वादाचे कलाबाह्य आस्वादाशी असलेले नाते विसरून चालणार नाही. दोहोंमध्ये शैलीचे सूत्र तर आहेच. इतरही साम्ये आहेत. एकाकीपणा आणि समाजात हरवून जाणे ह्या दोन्ही स्थिती सुसह्य करण्याचे सामर्थ्य... कलाबाह्य आस्वादात आहे, तसेच कलास्वादातही आहे. शैलीचा व्यापक विचार करायचा तर ललितकला आणि गौणकला ह्यांचे हे जे आरोग्यदायी फलित (थेराप्युटिक किंवा हायजिनिक इफेक्ट) आहे, त्याचा विचार डावलून चालणार नाही. मनोरंजन आणि सुशोभन ह्यांचे कलेला वावडे नाही. अर्थात कला त्यांच्यापलीकडे जाते हे खरे'[१२].

ललितकलांचं बाह्यरूप आणि अंतरंग आणि त्यापलीकडचा आशय जाणून घ्यायचा असेल तर केळकरांची ही भूमिका स्वीकारणं आवश्यक आहे.

■

## संदर्भ


१. केळकर, अशोक रा०, २००८, 'रुजुवात', मुंबई, लोकवाङ्मय गृह – 'भारतीय ललितकला (आधुनिक) वयात येतात', पृष्ठ २६७-२६९
२. तत्रैव, 'नाटक – एक होणे', पृष्ठ ९९
३. तत्रैव, 'नृत्य, कथक आणि रोहिणी भाटे : एक सम्यग्दर्शन', पृष्ठ १२६-१३१
४. गोखले, शरच्चंद्र विष्णू. १९७९, 'लयतालविचार', मुंबई, साहित्य संस्कृती मंडळ, महाराष्ट्र राज्य
५. रानडे, अशोक दा०, २००९, 'संगीतविचार', मुंबई, पॉप्युलर प्रकाशन

६. भाटे, रोहिणी. २००६, 'लहजा', मुंबई, मौज प्रकाशन – 'कोरिओग्राफी आणि तिचे भारतीय संदर्भ', पृष्ठ १०५-१०६

७. उनि ('रुजुवात') - 'नृत्य, कथक आणि रोहिणी भाटे : एक सम्यग्दर्शन', पृष्ठ १२९

८. गोडसे, दत्तात्रय ग॰, १९८५, 'ऊर्जायन', मुंबई, पॉप्युलर प्रकाशन, 'ऊर्जायन...' पृष्ठ १

९. उनि ('रुजुवात') - 'नृत्य, कथक आणि रोहिणी भाटे : एक सम्यग्दर्शन', पृष्ठ १३०

१०. मर्ढेकर, बा॰सी॰, १९८३, मुंबई, मौज प्रकाशन, भाषांतर – रा॰भि॰ जोशी, - 'काव्य आणि सौंदर्यमीमांसा', पृष्ठ २९;
उनि ('रुजुवात') – 'कवितेचे असतेपण', पृष्ठ १६

११. उनि ('रुजुवात') – भाषा आणि साहित्य, पृष्ठ ३०

१२. उनि ('रुजुवात'), 'आस्वादव्यापाराविषयी', पृष्ठ १४६.





# केळकरांचे भाषाविज्ञान

रमेश धोंगडे

डॉ. अशोक केळकरांची ख्याती भाषावैज्ञानिक म्हणूनच होती. मात्र भाषाविज्ञानातील विश्लेषक दृष्टी व विश्लेषण साधने, उदाहरणे देण्यातील मिस्किलता व चपखलपणा, वाद-प्रतिवाद सडेतोडपणे करण्याची पद्धती, पाठिंबा देणारे व खोडून काढणारे पुरावे शोधण्याची हौस ह्यांच्यावर त्यांच्या बौद्धिक क्षमतेचा स्पष्ट ठसा उमटला होता. याच संस्कारित बौद्धिक क्षमतेने त्यांनी भाषाविज्ञानाखेरीजच्या काव्यशास्त्र, चिन्हविज्ञान, शिक्षण, संगीत, नृत्य यांसारख्या अन्य क्षेत्रांतही आत्मविश्वासाने विहार केला. हॉकेटसारख्या संरचनावादी भाषावैज्ञानिकाच्या आणि निष्णात शिक्षकाच्या जबरदस्त प्रभावाखाली केळकरांचे भाषाविज्ञान तयार झाले. हा प्रभाव इतका जबरदस्त होता की, रचनान्तरणवादी किंवा जनकसूत्री भाषाविज्ञान समजत असूनही केळकर कधी त्याचे पाईक झाले नाहीत. याकोबसनचे काव्यशास्त्र, लहान मुलांचे भाषासंपादन, विनोदविश्लेषण त्यांना आवडे, पण याकोबसनसारखा प्रस्थापित चौकटीबाहेर जाण्याचा स्वच्छंदीपणा त्यांना रुचला नाही. सामाजिक भाषाविज्ञानातील गंपर्झची संरचनावादी बैठक त्यांना जवळची वाटे, तर चॉम्स्कीपासून फारकत घेण्याऱ्या मेकॉली, लेकॉफ, पोस्टल वगैरेंची त्यांना जवळीक वाटे. भाषाविज्ञानाच्या परिघाबाहेरचा इंग्रजी व्याकरणकार येस्पर्सन याच्याविषयी केळकरांना आदर होता तो त्याच्या तपशील सोडून मांडणी करणाऱ्या विवेचक वृत्तीमुळे. मला नेहमी असे वाटते की, केळकरांनी भर्तृहरीचे 'वाक्यपदीय' अभ्यासले असते तर ते त्याच्या चौकटीबाहेर जाण्याच्या वृत्तीच्या प्रेमात नक्की पडले असते. भर्तृहरीची विविध बाबींचा धांडोळा घेत प्रतिपादन करण्याची रीती केळकरांच्या रीतीशी जुळणारी होती. भारतीय व्याकरण परंपरेचा विचार केला तर केळकर हे अर्वाचीन काळातले भर्तृहरी होते.

निखळ भाषाविज्ञानामधील केळकरांच्या योगदानात केळकरांच्या दोन इंग्रजी ग्रंथांचा समावेश करावा लागेल. एक, मराठीच्या ध्वनि-व्यवस्था आणि रूपिम-व्यवस्था यावरील त्यांचा पीएच.डी.चा प्रबंध आणि दोन, मराठीच्या वाक्य-व्यवस्थेत वास्तुविद्या शोधण्याचा त्यांचा अनोखा प्रयत्न. मराठीतले ध्वनि-बदल विविध प्रकारचे आहेत – तेही केवळ शब्द-स्तरावर. सघोषीभवन आणि अघोषीभवन या परस्परविरोधी स्वनप्रक्रिया. पण विशिष्ट परिस्थितीत या दोन्ही






मराठीत कार्यरत होतात. उदा॰ 'सातदा'चा उच्चार 'साद्दा' असा तर 'भटजी'चा उच्चार 'भडजी' आणि 'नाकझरी'चा उच्चार 'नागझरी' असा होताना सघोषीभवन होते तर 'उदकाडी'चा उच्चार 'उत्काडी', 'गोड टाके'चा उच्चार 'गोट्टाके' आणि 'नागपूर'चा उच्चार 'नाकपूर' असा होताना अघोषीभवन होते. 'महादेव'चा उच्चार 'म्हादेव', 'नाही'चा उच्चार 'न्है' असा होताना प्राणस्फोटन होते. तर 'उठतो'चा उच्चार 'उटतो', 'रोखठोक'चा उच्चार 'रोक्टोक', 'शोधतो'चा उच्चार 'शोद्तो' असा होताना निष्प्राणस्फोटन होते. यामागचे स्वनाश्रयी संदर्भ केळकर अतिशय तपशिलात जाऊन काटेकोरपणे देतात.

मराठी वाक्यरचनेतील आर्किटेक्चर शोधताना केळकरांची वाक्यरूपावरील पकड यत्किंचितही कमी होत नाही. मात्र वाक्यार्थ विचारात घेताना रूपलक्षी अर्थविन्यासाच्या चौकटीत ते अडकत नाहीत. सर्वसाधारणपणे ज्या अर्थाची व्यवस्था लावता येते त्या अर्थाचाच पाश्चात्य भाषावैज्ञानिक अर्थविन्यासात समावेश करतात. पण वाक्याच्या प्रत्यक्ष वापरात त्याचा अर्थ संदर्भानुसार बदलतो. 'मी गाडी विकली'चा अर्थ लावताना मी व गाडी ही दोन विधिसाधके मानण्यात येतात. ही दोन विधिसाधके 'विकणे' हे क्रियापदच देते. वाक्यातील प्रत्येक क्रियापद आपली विधिसाधके ठरविते व त्यांना विशिष्ट कार्यही देते. मात्र एखाद्या घरात पैशाची चणचण आहे, पैसा कसा उभा करायचा हा बिकट प्रश्न आहे अशा संदर्भात घरातील एखादी व्यक्ती विशिष्ट सुरयोजन वापरून हे वाक्य म्हणेल तर त्याचा अर्थ 'मी पैशाची तरतूद केली आहे,' असा होईल. पण विकणे या क्रियापदाचा अर्थ पैशाची तरतूद करणे असा सदासर्वकाळ असणार नाही. म्हणून या प्रकारच्या अर्थाची सोय पाश्चिमात्य भाषाविज्ञानात भाषावापरशास्त्र या शाखेत केली जाते. हरघडी व्यक्तीपरत्वे बदलणाऱ्या अर्थाचे सिद्धान्तन करणे अशक्य मानले जाते. म्हणून सैद्धान्तिक भाषाविज्ञानात भाषावापरशास्त्राला स्थान नाही. अगदी अलीकडच्या भाषाविज्ञानात शब्दांचे अर्थघटक वाक्यव्यवस्थेवर प्रक्षेपित होतात असे एक सार्वत्रिक तत्त्व मांडले जाते. पण तो विषय निराळा. केळकर सार्वत्रिक तत्त्वांच्या फंदात न पडता संरचनावादी भूमिकेतून मराठी या विशिष्ट भाषेच्या वाक्यार्थाचा विचार करतात. भाषावापर हा भाषावैज्ञानिक विश्लेषणात बाजूला टाकण्याचे कारण नाही, असे त्यांना वाटते. एका विशिष्ट शिस्तीत ते भाषावापरातील अर्थाचा वाक्यार्थात समावेश करतात.

केळकरांचे निखळ भाषाविज्ञानावरचे हे दोनही ग्रंथ इंग्रजीत आहेत. भाषाविज्ञानातील आधुनिक काळातील देवाण-घेवाण, वाद-प्रतिवाद यासाठी इंग्रजी हीच ज्ञानभाषा मानली गेली असल्यामुळे आणि आधुनिक भारतीय ज्ञानपरंपरेत ती स्वीकारली गेली असल्यामुळे हे ग्रंथ इंग्रजीत असणे समजण्यासारखे आहे.

केळकरांचा इंग्रजीला विरोध कधीच नव्हता पण मराठीचा आग्रहही ते नेटाने धरत. मराठीतील केळकरांचे सर्व लेखन हे प्रामुख्याने उपयोजित भाषाविज्ञानात पडते. 'वैखरी' हा त्यांचा ग्रंथ तर मराठीमध्ये वेळोवेळी उपयोजित भाषाविज्ञानातील विषयांवर लिहिलेल्या लेखांचा संग्रह आहे. भाषा-सिद्धान्तन आणि भाषा-सिद्धान्ताचे उपयोजन असा फरक केला तर उपयोजित भाषाविज्ञान हे सैद्धान्तिक भाषाविज्ञानाचे बोट धरूनच पुढे जाऊ शकते हे स्पष्ट आहे. मराठीचे श्रवणप्रत्ययी लेखन, मराठी देवनागरी वर्णक्रम यांसारख्या लेखांत केळकर सामान्य भाषाविज्ञानाचा आधार घेत मुद्दे मांडताना दिसतात. उदा॰ 'अॅ' या स्वराचा क्रम 'ए'नंतर किंवा 'ऑ' या स्वराचा क्रम 'ओ'नंतर लावण्यात ध्वनिशास्त्राचा विचार आहे.

संरचनावादी भाषाविज्ञान आणि भाषा-शिक्षण यांचे संबंध पहिल्यापासूनच दृढ आहेत. भाषा-अध्ययन आणि भाषा-अध्यापन हे संरचनावादी भाषाविज्ञानातूनच नव्याने पुढे आले. संस्कृत भाषेमध्ये तज्ज्ञ असणारी व्यक्ती अखिल भारतीय भाषांतील समस्यांवर तोडगा सुचवणारी तज्ज्ञ असते हा भ्रम आहे, असे केळकर स्पष्टपणे म्हणतात. संस्कृत शास्त्र्यांनी मराठीची व्याकरणे लिहिण्याचे खटाटोप महाराष्ट्रात पहिल्यापासूनच केले. व्याकरणकाराला भाषाविज्ञान येणे आवश्यक आहे, हे केळकरांच्या लेखातून स्पष्ट होते. मराठीचे संरचनावादी विश्लेषण वापरून मराठीचे अध्यापन कसे करायचे हे केळकरांनी विस्ताराने सांगायला हवे होते. सैद्धान्तिक उपयोजनाचा तो मराठीतील आदर्श ठरला असता. 'मराठी व्याकरणाची नवी दिशा' या लेखात केळकर प्रामुख्याने रूपिम-व्यवस्थेची व काही प्रमाणात वाक्य-व्यवस्थेची चर्चा करतात. पारंपरिक व्याकरण शिकलेल्या किंवा शिकवणाऱ्या वाचकाला संरचनावादी पद्धतीने मराठी व्याकरणात काय यायला हवे ते यातून चांगले समजले. संरचनावादी भाषाविज्ञानात वाक्यविचार हा यथातथाच होता. वाक्यांचे प्रकार, वाक्याचे निकटचे व दूरचे घटक यांपलीकडे तो जात नाही. वाक्यार्थाला तर जवळजवळ फाटाच मिळतो. १९५७ साली आलेल्या रचनान्तरणवादी भाषाविज्ञानाची जाण केळकरांना १९६४मध्ये नक्कीच असणार. खरे म्हणजे केवळ संरचनेकडे लक्ष दिल्यामुळे अर्थ-संदिग्धतेकडे होणारे दुर्लक्ष, भिन्न संरचना असणाऱ्या वाक्यांचा समानार्थ, उलट एकच अर्थ दोन भिन्न संरचनांनी व्यक्त करता येण्याची भाषेची क्षमता, शब्दसिद्धीप्रमाणे वाक्यसिद्धीच्या असण्याऱ्या प्रक्रिया यांचा उल्लेख या लेखात केळकरांना जरूर करता आला असता. पण कारक संबंधाच्या पुढे ते का जात नाहीत हे एक कोडेच आहे.

१९६०च्या दशकात अमेरिकेत लबव्हच्या लेखातून सामाजिक भाषाविज्ञान पुढे आले. भारतात १९८०नंतर सामाजिक भाषाविज्ञानाची हवा आली. 'भाषेचे नियमन', 'भाषेचे नियोजन' आणि 'भाषा शिक्षण' हे केळकरांचे तीन लेख अनुक्रमे

१९६७, १९७९ आणि १९७० या काळातले. हे तीनही विषय सामाजिक भाषाविज्ञानाचे. म्हणजे या भाषाविज्ञानाची दखल केळकरांनी आणि तीही मराठीमध्ये लवकरच घेतली. लबव्हचे संशोधन हे संपूर्ण भाषाव्यवहारावरचे नव्हते; विशिष्ट भाषिक बाबी कोणत्या सामाजिक संदर्भात आणि कशा प्रधान किंवा गौण ठरतात याविषयी खोलात जाऊन केलेले सर्वेक्षण ही त्याची सामग्री. भाषा शिक्षण-नियमन-नियोजन हे तसे पसरट विषय. त्यांचा आवाका मोठा. याबाबतचे सर्वेक्षण हे मोठ्या स्तरावरचे सांघिक काम असते. केळकर सर्वेक्षणापासून दूर राहतात. त्यामुळे त्यांचे याबाबतचे लेखन हे तज्ज्ञाचे मुक्त-चिंतन या स्वरूपाचे आहे. अर्थात तज्ज्ञ आणि चिंतन या दोन शब्दांमुळे ते एरवी उदंड असणाऱ्या सर्वजात समजुतींचे व वैयक्तिक मतांचे संकलन नव्हे हेही लक्षात यावे.

मराठी समाजातील मुलांना मराठीतूनच म्हणजे मातृभाषेतूनच शिक्षण द्यावे असा केळकरांचा विचार. मात्र स्वभाषा ही एकच भाषा असते, स्वभाषेतून शिक्षण घेणे अधिक प्रभावी असते, याबाबत कोणत्या भाषावैज्ञानिकांनी केव्हा आणि कसे संशोधन केले याचे मार्गदर्शन केळकरांनी करायला हवे होते. अन्यथा आदिवासींची भाषा शिक्षणात प्रथम दोन-तीन वर्षे व पुढे मराठी, आणि मराठी भाषक मुलांना मात्र मराठीतून माध्यमिकपर्यंतचे शिक्षण हे कसे याचा उलगडा होणार नाही. बहुभाषिकता हे भारतीय समाजाचे एक स्थिर वैशिष्ट्य आहे आणि 'स्वभाषा', 'माध्यम' यांचा विचार या संदर्भात करायला हवा. केळकरांचा इंग्रजीला विरोध नाही. ते तिसरीपासून शिकवावे असे त्यांचे मत. इंग्रजीचा वापर मराठीच्या जोडीला माध्यम म्हणून करावा असेही ते म्हणतात. इंग्रजी माध्यमाच्या शाळांना त्यांचा विरोध आहे. केवळ मराठी माध्यमाच्या आग्रहातील धोकेही त्यांना दिसतात. म्हणजे शाळेच्या वर्गीकरणात 'मराठी माध्यम' पण शाळेत 'इंग्रजीचा प्रभाव' अशी काहीशी परिस्थिती यातून अभिप्रेत होते. इंग्रजी माध्यमाच्या वर्गातील शाळा तिसरीपासून मराठी शिकवून मराठीचा प्रभाव आणतात असे म्हटले तर? अमराठी शाळांतील विद्यार्थ्यांच्या भाषेबाबतचा प्रश्न तेथील परिस्थितीनुसार सोडवावा असे म्हणण्यात एक प्रकारे भाषेचे नियोजन प्रांत, राज्य, देश ही राजकीय कारभार क्षेत्रे भाषेच्या नियोजनास आधारभूत मानता येणार नाहीत, अशी सूचना येते. शिक्षणाचा केंद्रबिंदू प्रतिमारूप विद्यार्थी न राहता व्यक्तिरूप विद्यार्थी असायला हवा. मग प्रत्येक विद्यार्थ्याच्या संदर्भातच त्याच्या/तिच्या शिक्षणाचा विचार करता येईल. पण शिक्षणाचे धार्मिकीकरण, प्रांतीकरण, राष्ट्रीयीकरण यांतील आधारभूत गृहीतांना आव्हान देण्याचे सामर्थ्य आज आहेच कुठे?

व्यक्तीच्या समस्यांचे भान केळकरांच्या लेखनात जागोजाग दिसते. व्यक्तीच्या मठ्ठपणावर केलेली बोचरी टीकाही त्यांच्या लेखनात जागोजागी दिसते.

आधुनिक सामाजिक भाषाविज्ञानात भाषा, बोली या संकल्पनांच्या वैधतेबाबत आणि उपयुक्ततेबाबत शंका घेतल्या जातात. केळकरांचे मराठीच्या बोलीबाबतचे विवेचन किंवा भाषेच्या नियोजनाबाबतचे विवेचन कोणत्याही ठोस निर्णयाकडे किंवा ठोस कार्यक्रमाकडे जात नाही. अनेकदा वेगवेगळ्या भाषावैज्ञानिकांची मते मांडण्यावरच त्यांचे लेखन थांबते. मग ते लिपीबाबतचे असो की भाषिक संशोधनाच्या दिशांबाबतचे.

भाषाविज्ञानाला मराठी समाजाने अद्याप प्रतिष्ठा दिली नाही असे केळकरांना वाटते. जेथे जेथे भाषेसंबंधीचा किंवा भाषेवर अवलंबून असणारा प्रश्न आहे तेथे तेथे भाषावैज्ञानिकांची मदत न घेणे याला ते अडाणीपणा म्हणतात. मात्र भाषावैज्ञानिकही काहीवेळा अपुरे पडतात असे ते मानताना दिसत नाहीत. उदाहरणार्थ, महाराष्ट्रात आदिवासी भाषांतून प्राथमिक शिक्षण देण्याचा प्रयोग बंद करण्यात आला. भाषाविज्ञानावरील निष्ठेमुळे केळकरांना याचा राग येतो आणि नागालँडमध्ये हाच प्रयोग अद्यापही यशस्वीरितीने चालू आहे, यात त्यांना भाषाविज्ञानाचा विजय व गौरव दिसतो. पण महाराष्ट्रातील प्रयोग फसला आणि नागालँडमध्येही आज तो प्रयोग बंद झाला आहे, हे कटू वास्तव आहे. सरकारचे नव्हे, संस्थांचे नव्हे तर भाषावैज्ञानिकांचे काय चुकले याचा विचार का करू नये? 'वैखरी' आणि 'रुजुवात'ने मराठी वाचकाला इतपत तयार केले तर केळकरांच्या परिश्रमांचे चीज होईल. विविध भाषाविषयक प्रश्नांची मांडणी आणि चर्चा उपलब्ध भाषाविज्ञानाच्या आधारे करून केळकरांनी भाषाविज्ञानाला मराठी समाजात प्रतिष्ठा मिळवून दिली असे निश्चितपणे म्हणता येईल.

■

**अचूक शब्दाचा शोध**

अशोकचे भाषेवरचे प्रेम हे जीवनावरच्या प्रेमाचा एक अविभाज्य भाग होते. ज्या ज्या अनुभवांनी – भावनांनी आणि विचारांनी – तो समृद्ध झाला होता त्या त्या अनुभवांना अचूक शब्द शोधण्याची त्याची ओढ ही कवीच्या शब्दसमर्पकतेपेक्षा वेगळ्या प्रकारची असली तरी ती कमी तीव्र नव्हती. तिचे जातकूळ वेगळे होते. जीवनातून प्रयोगशाळेत – मग ती वैचारिक प्रयोगांची असो किंवा प्रत्यक्ष प्रयोगांची असो – आणि प्रयोगशाळेतून परत जीवनाकडे असा त्याचा सतत प्रवास चालू असे. त्याने आपल्या भाषासंशोधनाला जीवनाच्या सर्व अंगांकडे वळवले आणि सर्व जीवनव्यवहारांना आपापली अचूक भाषा मिळावी ह्याकरता आयुष्य वेचले.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)



# डॉ॰ केळकरांच्या कल्पनेतला मराठी-इंग्रजी शब्दकोश

कलिका मेहता

डॉ॰ अशोक रा॰ केळकर हे मीमांसक, समीक्षक, आंतरराष्ट्रीय कीर्तीचे भाषावैज्ञानिक. त्यांनी मराठी-इंग्रजी द्वैभाषिक कोशाचा महाप्रकल्प हाती घेतला होता.

डॉ॰ केळकरांनी १९७०च्या दशकात ह्या प्रकल्पाला सुरुवात केली होती. शब्दकोश-निर्मितीच्या ह्या कार्यात त्यांच्याबरोबर अमेरिकेतील भाषावैज्ञानिक प्रो॰ साऊथवर्थही सहभागी झाले होते. परंतु व्हिएटनाममधील युद्धाच्या काळात अमेरिकन सरकारने आर्थिक मदत देण्याचे थांबवल्यामुळे प्रो॰ साऊथवर्थना ह्या प्रकल्पातून बाहेर पडावे लागले. त्यामुळे केळकर सरांच्या एकट्याच्या खांद्यावर ह्या प्रकल्पाच्या जबाबदारीचे ओझे येऊन पडले. आर्थिक मदतीच्या आणि मनुष्यबळाच्या अभावामुळे अनेक वर्षे हे काम तसेच पडून राहिले.

२००६मध्ये सरांनी तो प्रकल्प भारतीय भाषा संस्थान, मैसूर ह्या संस्थेकडे सोपवण्याचा निर्णय घेतला आणि त्या संस्थेचे तत्कालीन संचालक प्रो॰ उदय नारायण सिंह ह्यांनी हा प्रकल्प पूर्ण करण्याची जबाबदारी उचलली. ह्या संस्थेच्या सात भाषाकेंद्रांपैकी पुणे येथील पश्चिम विभागीय भाषा केंद्राकडे हे काम देण्यात आले.

हा महाशब्दकोश द्वैभाषिक स्वरूपाचा आहे. पश्चिम विभागीय भाषा केंद्राला दिलेल्या नोंदींच्या चिठ्ठ्यांची (स्लिप्स) संख्या जवळजवळ ८० हजार इतकी आहे.

केवळ शब्दार्थ सांगणे हेच शब्दकोशाचे प्रमुख कार्य ह्या पारंपरिक विचारात अडकलेल्या शब्दकोशाचे स्वरूप आधुनिक काळात जरी बदललेले असले तरी शब्दकोशाची व्याप्ती किती असावी हा शब्दकोशकाराला कायम सतावणारा प्रश्न असतो.

भाषावैज्ञानिकाच्या कल्पनेतून साकारणारा शब्दकोश हा पारंपरिक शब्दकोशापेक्षा वेगळा असतो. भाषेच्या व्याकरणाचे नियम, शब्दार्थ आणि सर्वसामान्य भाषिक व्यवहाराची माहिती हे तीनही स्तर भाषावैज्ञानिकाला द्यावे लागतातच, शिवाय त्यांच्या दृष्टीने शब्दांमधील समानार्थता, विरुद्धार्थता, अनेकार्थता, सरूपता असे अर्थसंबंध शब्दकोशात देणे गरजेचे असते.





अनुक्रमणिका

भाषेच्या स्वनविन्यासापासून अर्थविन्यासापर्यंत सर्व नियम सांगून प्रत्येक शब्दाचे वर्णन त्या नियमांच्या चौकटीत बसवणे हे भाषावैज्ञानिकाला अभिप्रेत असणाऱ्या कोशाचे उद्दिष्ट असते. अर्थात हे कोशाचे स्वरूप वापरकर्त्याच्या गरजेवरही अवलंबून असते.

डॉ० केळकरांच्या व्यासंगातून अशाच अत्यंत विस्तृत,सर्वसमावेशक,शब्दाची सर्व प्रकारची माहिती देण्याची क्षमता बाळगणाऱ्या शब्दकोशाच्या निर्मितीची सुरुवात झाली आहे.

या शब्दकोशात प्रत्येक शब्दाच्या नोंदीमध्ये कोणती माहिती असावी याविषयी डॉ० केळकरांनी स्वतःच लिहून ठेवले आहे. 'इंडियन लिंग्विस्टिक्स'च्या एकोणतिसाव्या आणि तिसाव्या खंडांमध्ये त्यांनी लिहिलेल्या 'द नॉलिज ऑव्ह अ डिक्शनरी एन्ट्री विथ सँपल्ज प्रपोज्ड फॉर अ मराठी - इंग्लिश डिक्शनरी' हा लेख प्रसिद्ध झाला होता. लेखाच्या शीर्षकात सूचित केल्याप्रमाणे या लेखामध्ये नोंदीचे १३ नमुने आहेत. या शब्दकोशासाठी नोंदीच्या चिठ्ठ्या (स्लिप्स) तयार करताना डॉ० केळकरांनी मांडणीची तीच पद्धत स्वीकारली आहे आणि आदर्श शब्दकोश कसा असावा याचे उत्तम उदाहरण घालून दिले आहे. त्यांनी निवडलेल्या या १३ नोंदींवरून भाषेच्या अभ्यासकांना आणि सामान्य वाचकांनाही कोशकाराला येणाऱ्या अडचणींची कल्पना येते.

१. सर्वप्रथम नोंद म्हणून शब्दकोशात आलेला प्रत्येक शब्द देवनागरी लिपीत प्रचलीत पद्धतीनुसार लिहिलेला आहे.
२. त्यानंतर आंतरराष्ट्रीय ध्वनिलिपीत काही चिन्हे व रोमन लिपीतील काही चिन्हे यांचा उपयोग करून त्या शब्दाचे उच्चारण लिप्यंतरण करून दिले आहे.
३. त्यानंतर त्या शब्दाचा व्याकरणिक प्रवर्गही (शब्दांची जात) नमूद केला आहे. उदा० नामासाठी N, क्रियाविशेषणासाठी adv, विशेषणासाठी adj, उपसर्गासाठी म्हणजेच पूर्वप्रत्ययासाठी pfx अशा शब्दांच्या सर्व जाती दिल्या आहेत. नामाचे लिंग M- पुल्लिंग, N- नपुंसकलिंग, F- स्त्रीलिंग ह्या अक्षरांनी दर्शवले आहे. क्रियापदांपुढे ती सकर्मक आहेत की अकर्मक आहेत की प्रयोजक हे स्पष्ट केले आहे. अकर्मक क्रियापदांसाठी VI म्हणजे Verb intransitive आणि सकर्मक क्रियापदांसाठी VT म्हणजे Verb transitive अशा संक्षिप्त रूपांचा उपयोग केला आहे.
४. नोंदीतला मुख्य शब्द कोणत्या भाषेतून आलेला आहे, हे सांगण्यासाठी निरनिराळ्या भाषांची वेगवेगळी संक्षिप्त रूपे व्याकरणिक प्रवर्गानंतर दिली आहेत. उदा० संस्कृतसाठी Skt, हिंदीसाठी H,पार्शियनसाठी Pers इ०

५. केळकरांनी शब्दकोशाच्या निर्मितीबाबत किती सूक्ष्म विचार केला आहे हे प्रत्ययाला आणून देणारी आणखी एक बाब म्हणजे त्यांनी नोंदीत चार प्रकारचे कंस वापरले आहेत.

(अ) शब्दाचे घटक दर्शवण्यासाठी त्यांनी { } अशा महिरपी कंसाचा वापर केला आहे. उदा॰ कवडा या शब्दाचे कवि आणि डा हे घटक त्यांनी महिरपी कंसात स्पष्ट केले आहेत. {कवि-डा} आणि त्यानंतर कवडा ह्या शब्दाचा उपयोग तिरस्कार, तुच्छता व्यक्त करण्यासाठी केला जातो हेही स्पष्ट केले आहे.

(आ) < > असा कोनात्मक कंस एखाद्या शब्दाच्या अर्थाचे विश्लेषण करण्यासाठी वापरला आहे. शब्दाच्या अर्थाच्या बाबतीत विश्वकोशातल्या माहितीच्या स्वरूपाचे अधिक स्पष्टीकरण द्यायचे असल्यास शब्दापुढे सरळ आडवी रेघ देऊन स्पष्टीकरण या प्रकारच्या कंसात दिले आहे. उदा॰ अंग या शब्दाच्या नोंदीपुढे < > असा कंस देऊन त्या कंसात <body of a human being, especially trunk as opposed to head and limbs> मानवाचे शरीर, विशेषतः धड, डोके आणि इतर अवयव नव्हेत- अशी जास्तीची माहिती दिली आहे.

(इ) नेहमीच्या ( ) अशा प्रकारच्या गोल कंसातही संवर्गीय वैशिष्ट्ये (Paradigmatic) किंवा आवश्यक तिथे जास्तीची माहिती दिलेली आहे. उदा॰ डॉ॰ केळकरांनी X Y Z ही अक्षरे सहसा निर्जीव वस्तूंसाठी वापरली आहेत. अंगाच्या नोंदीत xA च्या अंगाबरोबर आहे. (X-poison-विष म्हणजे Xच्या जागी अपेक्षित असणारा शब्द ह्या प्रकारच्या गोल कंसात दिला आहे. अवतरणांचे भाषांतर करताना तो शब्द ब्रिटिश इंग्रजीतला आहे की अमेरिकन इंग्रजीतला हेही ह्याच प्रकारच्या कंसात नमूद केले आहे. उदा॰ (Brit)- म्हणजे ब्रिटिश इंग्रजीतला आणि (US) म्हणजे अमेरिकन इंग्रजीतला.

(ई) [ ] अशा चौकोनी कंसात पूरक माहिती दिली आहे.

६. केळकरांनी शब्दकोशातील नोंदीच्या मांडणीची जी पद्धत ठरवली आहे. तिच्यात अंकांनाही खूप महत्वाचे स्थान आहे. कारण या शब्दकोशात शब्दांमधील सरूपता आणि अनेकार्थता या संबंधांचेही विश्लेषण केलेले आहे. शब्दांची सरूपता दर्शवताना म्हणजेच जर दोन शब्दांच्या नोंदी प्रचलित





अनुक्रमणिका

लेखनपद्धतीनुसार सारख्या असतील तर त्या नोंदीच्या आधी अंक दिलेले आहेत उदा०

१ मारणे to kill (ठार मारणे)

२ मारणे to exert physical violence (झोडणे,बदडणे)

किंवा

१ भांग-parting of the hair (केसांचा भांग)

२ भांग- name of a plant (एका रोपाचे नाव)

त्याचप्रमाणे शब्दांच्या नोंदीत जर एकापेक्षा जास्त परिच्छेद असतील तर 1,1a,1a1,1a2, असे अंकांनी व अक्षरांनी एकमेकांपासून वेगळे दाखविण्यात आले आहेत, म्हणजे १ ह्या अंकाने 1a, 1a1,1a2, अशा सर्व परिच्छेदांचा निर्देश होतो.

७. केळकरांनी नोंदीत अक्षरांचाही यथोचित उपयोग करून घेतला आहे. नोंदीत आवश्यक तिथे A,B,C या अक्षरांनी व्यक्तीचा निर्देश केला आहे

उदा० Aला वेळेचं भान नाही.

A ने B चा शब्द खाली पडू दिला नाही.

आधी सांगितल्याप्रमाणे नोंदीत X Y Z ही अक्षरे निर्जीव गोष्टींसाठी आली आहेत. उदा० X Aच्या अंगाशी आलं (X- food, action). जी गोष्ट A/Xची तीच गोष्ट B/Yची.

N हे अक्षर संदर्भानुसार योग्य संख्येसाठी वापरले गेले आहे तर V हे अक्षर संदर्भानुसार योग्य अशा क्रियापदाच्या धातुरूपासाठी वापरले आहे. उदा० ही V ayciची वेळ इथे V हे अक्षर संदर्भानुसार योग्य अशा क्रियापदाच्या धातुरूपासाठी वापरले आहे.

उदा० ही V ayci वेळ नाही. इथे Vच्या जागी कोणताही धातू येऊ शकतो.

८. शब्दकोशातील नोंद म्हणून आलेल्या शब्दाचा अर्थ तीन स्तरांवर स्पष्ट केला आहे.

(अ) मूलभूत किंवा प्राथमिक अर्थ. ह्या प्रकारच्या अर्थामध्ये शब्दाचा वापर, त्यामध्ये त्या शब्दाबरोबर साहचर्य संबंधाने नेहमी वापरले जाणारे शब्द, ह्या शब्दाचे प्रतिसंदर्भ, त्याचे समानार्थी, विरुद्धार्थी ह्या सर्वांचा अंतर्भाव आहे. उदा० तोंड म्हणजे face.

(आ) अर्थाचा दुसरा स्तर कोनात्मक कंसात दिला आहे. ह्या भागात शब्दाच्या अर्थाशिवाय शब्दाच्या अर्थाचे विश्लेषण [ज्ञानकोशातल्या माहितीच्या धर्तीवर] दिलेले आहे. उदा० तोंड म्हणजे face ह्या





अनुक्रमणिका

मूलभूत अर्थानंतर कोनात्मक कंसामध्ये <the front part of human body> - माणसाच्या शरीराचा पुढचा भाग.

(इ) अर्थाच्या तिसऱ्या स्तरामध्ये मराठी अवतरणांची इंग्रजीत भाषांतरे दिलेली आहेत. त्या भाषांतरातून अर्थ स्पष्ट करण्याच्या कौशल्यावरून केळकरांचे इंग्रजीवरील प्रभुत्व दिसून येते. उदा॰ वेळेचा गुण असतो- every moment has its favourable or adverse effect.

दह्याची कवडी मोडली- it lost the consistency and got scrambled.

ह्यावरून अशा प्रसंगी किंवा ह्या संदर्भात इंग्रजी भाषक कसा बोलेल, हा अर्थ कसा व्यक्त करेल हेही समजते व इंग्रजी भाषा शिकणाऱ्या मराठी भाषकालाही या भाषांतरित वाक्यांचा उपयोग होऊ शकतो.

९. केवळ शब्दाचा अर्थ आणि वापर देऊन केळकरांना अपेक्षित असलेली शब्दकोशातील नोंद परिपूर्ण होऊ शकत नाही. तो शब्द अनेक संदर्भांमध्ये व इतर अनेक शब्दांबरोबर वापरला गेल्याशिवाय तो अभ्यासकाला आकळत नाही. उदा॰ भांग हा शब्द केसांचा भांग या अर्थाने पाडणे, काढणे, फाटणे या क्रियापदांबरोबर येतो. तर तोच शब्द एक अमली रोप व पेय या अर्थाने घोटणे, चढवणे, चढणे, घेणे, पिणे या क्रियापदांबरोबर वापरला जातो.

तसेच अंग आणि ताप ह्या शब्दांचे अनुक्रमे अंग धरणे/आंबणे/टाकणे/मोडून येणे आणि चढणे/येणे/उतरणे/असणे ह्या क्रियापदांच्या साहचर्याने काही क्रियापदबंध तयार होतात.

१०. चांदणी चिन्ह (ॲस्टरिस्क मार्क)

ह्या शब्दकोशात मुख्य शब्दावरून तयार होणाऱ्या सर्व वाक्प्रचारांचा समावेश आहे.

नोंदीत जर एकापेक्षा जास्त परिच्छेद असतील तर ते एक किंवा दोन चांदणी चिन्हांनी दर्शविले जातात.

जर वाक्प्रचार नोंदीच्या मुख्य शब्दाने सुरू होत असेल तर तिथे एका चांदणी चिन्हांची खूण असते. उदा॰ अंग च्या नोंदीत * घासणे, * चोरणे, * झाडणे इ॰

ह्याउलट वाक्प्रचारात नोंदीतल्या मुख्य शब्दाचे प्रत्यय वगैरे लावून केलेले रूप असेल तर तिथे दोन चांदणी चिन्हे असतात. उदा॰ **शी येणे, **त वारे संचारणे, **वर धावून जाणे, **वरून वारे जाणे इ॰

जर नोंदीत मुख्य शब्दाच्या अर्थासारख्या आणखी काही शब्दांची यादी असेल तर ते तीन चांदणी चिन्हांनी दाखवले जाते. उदा॰ भांग ह्या शब्दाची गांजा, कुसुंबा, चरस, हशीश ह्या शब्दांशीही तुलना करून दाखवली आहे. त्यांचे अर्थही दिलेले आहेत. हे शब्द दोन उभ्या समांतर रेघांनी दाखवले आहेत. ह्यावरून हा शब्दकोश केवळ शब्दांचे अर्थ देण्याचे कार्य साध्य करत नसून त्यात थिसॉरसचीही वैशिष्ट्ये आहेत असे लक्षात येते.

११. शब्दाच्या नोंदीच्या रचनापद्धतीत चिन्हांचाही समावेश आहे उदा॰ [० नल् (null)] हे चिन्ह, जर नोंदीतला शब्द किंवा त्या शब्दाचा काही भाग प्रत्ययाला जोडून आला तर वापरले जाते. उदा॰ दह्याला पाणी सुटलं हे वाक्य (दही ह्या शब्दाच्या नोंदीत) ०ला पाणी सुटलं असे लिहिले जाते.

ह्याउलट जर नोंदीतला शब्द वाक्यात सुटा येत असेल तर आडवी वक्र रेखा वापरली जाते. उदा॰ ~ लागलं नाही म्हणजे दही लागलं नाही.

१२. केळकरांनी नोंदीत त्या त्या शब्दाची सर्व प्रकारची माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. तो शब्द प्राचीन आहे की मध्ययुगीन आहे, वैदिक काळातला आहे की आधुनिक बोलीमधला आहे ही माहिती तर नोंदीत आहेच, शिवाय त्या शब्दाची शैलीगत माहिती, त्याच्या वापराबद्दलची जास्तीची माहिती म्हणजे तो शब्द लहान मुलांच्या बोलण्यात आढळतो की महिलांच्या, प्रतिष्ठित लोकांच्या बोलण्यात आढळतो, तसेच तो वाङ्मयीन आहे की पारिभाषिक आहे, तो शब्द औपरोधिक बोलताना वापरला जातो की विनोदाने बोलताना, शिव्या देताना वापरला जातो की आलंकारिक भाषेत बोलताना, तसेच त्याचा उपयोग फक्त कट्टा बोलीतच होतो का ही सर्व माहिती त्या त्या नोंदीत आवश्यकतेप्रमाणे दिलेली आहे.

केवळ तोंड या शब्दाच्या नोंदीत १५७ उपनोंदी आहेत. कोळी (जात या अर्थाने) या शब्दाच्या नोंदीत त्यांची महाराष्ट्रातील वास्तव्याची ठिकाणे, त्यांची लोकसंख्या ही सर्व माहिती आहे. म्हणजे खरे तर हा शब्दकोश नव्हे तर ज्ञानकोशच आहे. सामान्य माणसापेक्षा संशोधकाच्या, भाषाभ्यासकाच्या भाषावैज्ञानिकाच्या आणि कदाचित अनुवादकाच्या दृष्टीने या कोशाला अधिक महत्त्व आहे. वापरकर्त्याची एक बौद्धिक पार्श्वभूमी इथे गृहीत धरली आहे.

सर्वसामान्यांच्या मते, शब्दकोश तयार करणे ही सर्जनशील निर्मिती नसते. परंतु डॉ॰ केळकरांनी तयार केलेले नोंदीचे कागद पाहिले की वाटते ह्या नोंदींनाही त्यांच्या प्रतिभेचा परिसस्पर्श झालेला आहे. जीवनाचा, समाजाचा असा एकही पैलू नाही की जो केळकरांनी विचारात घेतलेला नाही. त्यांचे मराठी भाषेवरील व

वाङ्मयावरील प्रभुत्व, इंग्रजी भाषेवरील व वाङ्मयावरील प्रभुत्व आणि भाषाविज्ञानावरील प्रभुत्व यांचा त्रिवेणीसंगम म्हणजे हा महाशब्दकोश आहे. हा शब्दकोश जर विसाव्या शतकात पूर्ण झाला असता तर कोशशास्त्र ही भाषाविज्ञानाची शाखा मानली जावी की जाऊ नये हा वाद उद्भवलाच नसता. पश्चिम विभागीय भाषा केंद्रात चालू असलेले हे काम काही कारणांमुळे सध्या थांबले आहे. परंतु आम्ही केळकरांनी दाखवलेल्या दिशेनेच जायचा प्रयत्न करतो आहोत. परंतु बोलीभेद देणे किंवा वनस्पती वा प्राण्यांच्या प्रजातींना त्यांची मूळ लॅटीन किंवा शास्त्रीय नावे देणे हे सामान्य अभ्यासकाच्या आवाक्यापलीकडचे आहे.

डॉ॰ केळकरांनी आम्हांला दिलेले नोंदीचे सर्व कागद पूर्ण नाहीत. काही नोंदींचे ध्वनिलिपीत उच्चारण लिहायचे राहिले आहे तर काही नोंदींची अवतरणे लिहायची आहेत. काही नोंदींमध्ये अवतरणे आहेत पण त्यांचे भाषांतर झालेले नाही, तर काही नोंदींमध्ये फक्त शब्द दिलेला आहे. त्या शब्दाची वर सांगितल्याप्रमाणे संपूर्ण नोंदच तयार करायचे काम शिल्लक आहे. अशा प्रकारच्या कामात रुची आणि गती दोन्हीही असणारे मदतनीस मिळणेही अवघडच आहे.

डॉ॰ केळकरांच्या कल्पनेतील शब्दकोश पूर्ण करायचा आम्ही प्रयत्न करतोच आहोत आणि तीच त्यांना खरीखुरी श्रद्धांजली ठरेल.

■

**खरेपणाची आच**

अशोकच्या शिस्तीमुळे तो ज्या सभा, सेमिनार किंवा कॉन्फरन्सेसमध्ये भाग घेत असे त्यांना आपसूकच एक दर्जा प्राप्त होत असे. त्याच्या बारीक नजरेतून कोणताही बौद्धिक गुन्हा किंवा विचारांची उसनवारी सुटणार नाही ह्या जाणिवेने हजर असणारा, वक्ता आणि प्रेक्षक हे दोघेही बिचकून असत. त्याच्या ह्या धाकामागे स्वत:च्या विद्वत्तेचे स्तोम नसायचे तर खरेपणाची आच असे. त्याची शिस्त ही सत्यप्रियतेतून आलेली शिस्त होती. एकदा वक्ता उभा राहिला की त्याने प्रत्येक शब्द मोजून मापून वापरला पाहिजे हा त्याचा आग्रह असायचा. शब्दांचा गैरवापर, अतिशयोक्ती, वैचारिक गचाळपणा, भावनिक खोटेपणा, साहित्यिक अफरातफर, बुटचाटेपणा हे मराठी विचारविश्वातले सर्वत्र हजर असणारे सद्गुण त्याला खपत नसत.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)



# मराठी वाक्याचे वास्तुशिल्प

सोनल कुलकर्णी-जोशी

प्रा. अशोक केळकरांची चतुरस्त्र प्रतिभा अनेक विद्याशाखांत लीलया आणि मुक्त विहार करणारी होती. मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांत सारख्याच प्रभुत्वाने त्यांनी सामाजिक तत्त्वज्ञान, मानववंशशास्त्र, वाङ्मय, समीक्षा, शिक्षणपद्धती अशा अनेक विषयांवर लेखन केले आहे. ह्या सर्वांत भाषाविज्ञानाची त्यांची जाण आणि त्यातील गाढी विद्वत्ता थक्क करणारी होती. Language in a Semiotic Perspective : The Architecture of a Marathi Sentence हा १९९७मध्ये प्रकाशित झालेला ग्रंथ त्यांच्या भाषावैज्ञानिक लेखनाचा परमोच्च बिंदू मानता येईल. या ग्रंथात केळकरांनी भाषावैज्ञानिक विश्लेषणाचा एक संपन्न आणि व्यापक दृष्टिकोन मांडला आहे. भाषेचे सर्वांगीण विश्लेषण चिन्हमीमांसेच्या अंगानेच होऊ शकते, असा त्यांचा दावा होता. या विश्वासाच्या पुष्ट्यर्थ त्यांनी मराठी या प्रगत प्रदीर्घ इतिहास असणाऱ्या दक्षिण-आशियाई भाषेचा विचार केला आहे. मराठीचे शब्दभांडार, स्वनव्यवस्था, व्याकरण आणि अर्थांगव्यवस्था ह्या सर्व भाषा-स्तरांचा प्रवेशबिंदू म्हणून वाक्य हा एकक निवडून वाक्य विश्लेषणावर लक्ष केंद्रित केले आहे.

ह्या विस्तृत ग्रंथात चर्चिलेल्या सर्वच विषयांचे विवेचन या लेखात करणे शक्य नाही. ज्या प्रमुख मुद्द्यांभोवती ग्रंथ गुंफला आहे, त्यांचा उल्लेख ग्रंथाच्या शीर्षकातच आलेला आहे. ग्रंथशीर्षकाचा मराठीत स्वैर अनुवाद करावयाचा झाल्यास तो 'भाषा : चिन्हमीमांसेच्या परिप्रेक्ष्यातून मराठी वाक्याचे वास्तुशिल्प' असा करता येईल. त्यानुसार प्रस्तुत लेखात केळकरांच्या खालील विषयांवरील विचार जाणून घेण्याचा प्रयत्न केला आहे.

१. भाषा म्हणजे काय?

२. चिन्हमीमांसा म्हणजे काय?

३. वाक्य ह्याच एककाची विश्लेषणासाठी निवड का?

४. मराठी वाक्याचे वास्तुशिल्प म्हणजे काय?

५. संज्ञापनाचे माध्यम म्हणून मराठी वाक्य कसे कार्य करते?

## भाषा

ग्रंथाच्या संपूर्ण डोलाऱ्याला पायाभूत ठरेल अशी भाषेची सशक्त संकल्पना केळकरांनी दिली आहे. त्यांच्या मते, भाषा म्हणजे तिचे कार्य (Language is what it does). भाषेचे कार्य हीच तिची ओळख असेल तर तिच्या कार्याची स्पष्ट कल्पना असायला हवी.

- भाषा वास्तवाचे निरीक्षण करते – 'तंतोतंतपणा'च्या वेगवेगळ्या प्रमाणात. जसे की 'पाऊस पडतोय', 'पाऊस कोसळतोय', 'पाऊस झरतोय'.
- भाषा वास्तवावर निरीक्षण नोंदवते. आनंदापासून तक्रारी पर्यंतच्या अनेक प्रतिक्रियांच्या स्वरूपात ही निरीक्षणे असू शकतात. 'वा! पाऊस!' 'पाऊस? आत्ता कशाला आला हा?'
- भाषा इच्छा, आकांक्षा व्यक्त करते. 'फक्त पाऊस तेवढा वेळेवर पडावा! पिके तयार असतील तेव्हा पाऊस न पडला तर बरं!'
- भाषा मागण्या करते. 'किती मिलीमीटर पाऊस पडला त्याची नोंद ठेवा.'

मनाच्या पातळीवरचे असे अनेक अमूर्त आशय व्यक्त करण्याचे, विचारांच्या सामाजिक देवाण-घेवाणीचे एक साधन म्हणून मानवाने भाषेचा शोध लावला. संज्ञापनाचे साधन म्हणून तिचा विकास केला. ह्या दृष्टीने भाषा मानव-निर्मित आहे. पण भाषा केवळ संज्ञापनाचे साधनच नाही तर ती आजूबाजूचे जग समजून घेण्याचे एक माध्यमही आहे. लहान मूल ज्या पद्धतीने आणि ज्या वेगाने भाषा अवगत करते, भाषेतून मिळणारे छोटे-छोटे दुवं वापरून भाषेपलीकडचाही आशय समजावून घेते त्यावरून भाषेच्या घडणीत निसर्गाचाही हात आहे, हे सिद्ध होते. 'म्हणूनच भाषा ही मानवाने निर्मिलेली आणि सामाजिक – सांस्कृतिक अंगाने विकसित केलेली अशी चिन्हव्यवस्था आहे. जगाच्या आकलनाचे माध्यम म्हणून ती निसर्गनिर्मित आहे (जशी आपली दृष्टी किंवा पचनसंस्था) आणि त्याचवेळी दैनंदिन संज्ञापनाचे साधन म्हणून ती मानवनिर्मितही आहे (जसे टूथब्रश किंवा पैसा). केळकरांच्या लेखी भाषेला अशी दुहेरी मान्यता आहे. मानवनिर्मित आणि निसर्गनिर्मितही.

## चिन्हमीमांसा

केळकरांच्या मते, भाषा-विश्लेषणाचे मूलभूत स्वरूप हे चिन्हमीमांसालक्ष्यीच आहे. भाषाव्यवहार हे मूलत: चिन्हांचा वापर (लिखित किंवा उच्चारित स्वरूपात) आणि त्यांचे आकलन ह्या स्वरूपात चालतात. वक्ता/प्रेषक आपला अमूर्त आशय स्वनिम-/अक्षर-चिन्हांच्या माध्यमातून व्यक्त करतो. आणि श्रोता/ग्राहक त्यांचे

आकलन करून प्रतिक्रिया देतो. भाषाशास्त्रात भाषाविश्लेषणाच्या मानस, समाज, संस्कृती इत्यादींशी निगडित अनेक सिद्धान्तांची रेलचेल आहे. केळकरांच्या मते हे वेगवेगळे सिद्धान्त एकेकट्याने भाषेचे सम्यक रूप वर्णन करण्यासाठी अपुरे आहेत – जसे की दृष्टांतपाठातील सात आंधळ्यांचे हत्तीबद्दलचे आकलन. हत्ती कोणाला सापाप्रमाणे वाटला, कोणाला सुपाप्रमाणे तर कोणाला खांबाप्रमाणे वाटला. प्रत्येकाचे वर्णन अंशतः खरे आहे पण पूर्ण सत्यापासून खूप लांब. भाषेलाही मानसिक, सामाजिक, सांस्कृतिक असे पैलू आहेत. पण ते सर्व चिन्ह-मीमांसेच्या परिघात सामावून जाऊ शकतात. वाक्य हा प्रारंभिक एकक मानून त्यातील घटक चिन्हांचे (कर्ता, कर्म, विशेषण, क्रियाविशेषण इत्यादी) आंतरसंबंध चिन्हमीमांसा तपासते. ही चिन्हे वास्तव जगाचा, भाषा-वापर कर्त्याच्या मानसिक, सामाजिक, सांस्कृतिक पार्श्वभूमीचा निर्देश करतात. त्यांचे आकलन करणे हा संदेशग्राहकाचा उद्देश असतो. अशा रीतीने चिन्हलक्ष्यी परिदर्शनात (सेमिऑटिक पर्स्पेक्टिव्ह) भाषेच्या मानसिक सामाजिक आणि सांस्कृतिक बाजूंचे भान राखूनही तिचे मूलभूत भाषापण अबाधित राहते. कारण चिन्हमीमांसा केवळ भाषेची रचनाच नव्हे तर भाषा प्रत्यक्ष कशी वापरली जाते (प्रॅग्मॅटिक्स) ह्याचीही दखल घेते. चिन्हव्यवस्थेच्या चौकटीत भाषेची व्याख्या निश्चित करताना केळकर भाषा-चिन्हांचे व्याकरण अर्थ आणि प्रत्यक्ष वापर ह्या सर्व बाजूंचा विचार करू शकतात. भाषेचे रूप (फॉर्म) आणि तिचा आशय (मीनिंग) ह्या दोहोंचा समावेश असणारी अशी विश्लेषणाची पद्धत भाषावैज्ञानिक विकसित करू शकतात.

### वाक्य

केळकरांच्या मते स्वन, शब्द, पद आणि अर्थ ह्या भाषाव्यवस्थेच्या सर्व स्तरांचा वाक्य हा प्रवेशबिंदू आहे. विश्लेषणासाठी वाक्य या व्याकरणिक एककाची निवड करण्याचे मुख्य कारण म्हणजे भाषेचे रूप आणि अर्थ ह्यांना जोडणारा पूल म्हणजे वाक्य. त्याला एकक किंवा शब्द किंवा पदबंध ह्यांचे स्वतंत्र अस्तित्व फारच मर्यादित आहे. व्याकरणाच्या पातळीवरील मोठ्यात मोठा घटक म्हणजे वाक्य. त्याचे विश्लेषण आपल्याला आपोआपच धातू, प्रत्यय इ॰ लहानात लहान घटकांकडे घेऊन जाते. पण त्याचबरोबर वाक्य-मालिकांच्या तुलनेत वाक्य हे आकलनाच्या आणि विश्लेषणाच्या दृष्टीने पुरेसे लहानही असते. असे वेगवेगळ्या संदर्भांतील त्याचे उपयोग व अर्थ सहज स्पष्ट करता येतात.

### वाक्य आणि वास्तुशिल्प

ग्रंथाच्या उपशीर्षकात मराठी वाक्यरचनेचा उल्लेख करताना एका रूपकाचा उपयोग केलेला आहे : मराठी वाक्याचे 'वास्तुशिल्प'. केळकरांच्या मते




अनुक्रमणिका

संदेशनप्रक्रियेत वाक्याची भूमिका किंवा प्रयोजन समजून घेताना वाक्याची 'घडण', 'बांधणी', 'प्रक्रिया', 'कार्य' इ० प्रचलित शब्दप्रयोग तोकडे पडतात. त्यांच्या पलीकडे जाऊन भाषा-रचनेच्या मागे जी 'योजनापूर्वक आखणी' किंवा 'आरेखन' (डिझाइन) असते ते विचारात घेतले पाहिजे. मुळात भाषा ही मानवाच्या अनेक कृतींप्रमाणे (जसे की घडा, चित्र, मूर्ती) एक कृती आहे. भाषाकृतीचे वास्तुकृतीशी साम्य आहे कारण या दोहोंचे पूर्ण रूप आकाराला येण्यापूर्वी निर्मात्यांच्या कल्पनेत त्यांचे एक अमूर्त आरेखन असते. या कृतींचे प्रयोजन आणि परिणाम गृहीत धरून केलेले शिल्पकला (स्कल्प्चर), मूर्तिकला किंवा चित्रकलेप्रमाणे वास्तुशिल्पकला ही केवळ प्रदर्शनासाठी (डिस्प्ले) नसते. परिसरातील पर्यावरणाशी जुळवून घेण्याच्या परिघातच घर उभे करण्याच्या मानवी प्रेरणेचे आणि क्षमतेचे प्रतीक म्हणजे वास्तुविद्या. केळकरांच्या सूक्ष्मदृष्टी प्रतिभेला भाषा-कृतीमागेही असाच उद्देश, तिच्या मूर्त आविष्कारामागचे असे अमूर्त आरेखन दिसते.

प्रत्यक्ष वास्तुउभारणीत मानवसमूहाचे तसेच तीव्र कल्पनाशक्तीच्या एखाद्याच वास्तुशिल्पकाराचेही योगदान असते. भाषारचना ही वास्तुशिल्पाप्रमाणेच मूलत: एक सामाजिक कृती आहे. पण भाषेच्या बाबतीतही एखादी व्यक्ती एखाद्या परिस्थितीत अभिव्यक्तीचा एखादा नवा आविष्कार शोधून काढते. त्याला समाजाची मान्यता मिळते आणि तो आविष्कार प्रस्थापित भाषाव्यवस्थेचाच एक भाग बनतो. ह्याचाच अर्थ वास्तुशिल्प आणि भाषेच्या घडणीत मानवसमूहाचे तसेच व्यक्तीचेही योगदान असते. अशा प्रकारे भाषा हे वास्तुशिल्पाप्रमाणेच एक सामूहिक उत्पादन आहे आणि कधी-कधी कलात्मक सृजनही, हा सारा आशय केळकर 'मराठी वाक्याचे वास्तुशिल्प' ह्या रूपकातून व्यक्त करतात.

## मराठी वाक्यविचार

भाषेची निसर्गनिर्मित आणि मानवनिर्मित अशी दुहेरी ओळख (ड्युअल स्टेटस) असते. विश्वाच्या आकलनाचे माध्यम आणि दैनंदिन संज्ञापनाचे साधन अशी तिची दुहेरी ओळख प्रस्थापित होते. भाषेच्या ह्या दोन कार्यांनुसार वाक्य हा भाषाघटकही दोन प्रकारे आपल्या समोर येतो. आकलनाचे माध्यम म्हणून जेव्हा वाक्याची बांधणी केली जाते, तेव्हा त्याची रचना क्रियासापेक्ष (डायथेटिक) असते. दैनंदिन संज्ञापनाचे साधन या भाषाकार्याशी संलग्न अशी वाक्यरचना ही संज्ञापनसापेक्ष रचना (कम्युनिकेटिव्ह स्ट्रक्चर) म्हणून ओळखली जाते. क्रियासापेक्ष रचनेत क्रियापद हा केंद्रबिंदू असतो. नाम, विशेषण, क्रियाविशेषण हे इतर वाक्यघटक हे वेगवेगळ्या पद्धतीने क्रियापदाशीच संबंधित असतात. ह्यांतील काहींची निवड ही क्रियापद-प्रकारावर अवलंबून असते. हे इतर वाक्यघटक व





अनुक्रमणिका

क्रियापद मिळून 'क्रियासापेक्ष प्रधानक (डायथेटिक न्यूक्लिअस) तयार होते. काही घटक सर्व क्रियापदांना चालणारे असतात. क्रियापदावर त्यांची निवड अवलंबून नसते. त्यांना क्रियासापेक्ष गौणके (डायथेटिक मार्जिन) अशी संज्ञा आहे. क्रियासापेक्ष प्रधानके व क्रियासापेक्ष गौणके मिळून रचना बनते.

क्रियासापेक्ष प्रधानकांची रचना ही स्थूलपणे वाक्याच्या केंद्रस्थानी असणाऱ्या क्रियापद-प्रकारावर अवलंबून असते. केळकरांनी मराठी क्रियापदांचे सहा प्रकार मानले आहेत. (त्यांची उदाहरणे तक्ता क्र० १मध्ये पाहा.) कर्ता, कर्म, धारक अशा संज्ञा वापरून त्यांनी मराठी वाक्याची रचना पुढीलप्रमाणे दर्शवली आहे.

| प्रकार | कर्ता | धारक | कर्म | उदाहरण |
|---|---|---|---|---|
| १ | + | − | + | उचल |
| २ | + | − | − | झोप |
| ३ | + | + | + | दे |
| ४ | + | + | − | भेट |
| ५ | − | + | − | उकड |
| ६ | − | − | − | उजाड |

तक्ता क्र० १. मराठी क्रियापदांचे प्रकार (केळकर १९९७:३४ वर आधारित)

इथे, कर्ता = कृती-प्रवर्तक; कर्म = क्रिया-उपादान, क्रिया-प्राप्त; धारक = आधान (-'ला') किंवा निधान (-'त', 'वर') किंवा अपाधान (-'ऊन', 'हून', 'पासून') ह्यांपैकी प्रत्येकाची अभिव्यक्ती ही क्रियापद-संवाद-प्रस्थापनेतून (कॉंकॉर्ड) किंवा विशिष्ट अंत्यप्रत्ययातून केली जाते.

वरील क्रियापद प्रकारांचा प्रत्यक्ष उपयोग दाखविणारी मराठी वाक्ये –

१. चोराने पिशव्या गोळा करणं.

२. चोराने साव बनणं.

३. चोराने मित्राला पिशवी बक्षीस देणं.

४. मित्राने चोराला सामील होणं.

५. चोराला वाईट वाटणं.

६. गरम होणं.

ह्या मूलभूत रचनेवर आधारित बाकीही अनेक वाक्यरचना प्रकार केळकरांनी दिले आहेत. ते मुळातून पाहावेत.

क्रियासापेक्ष घटकांचा वाक्यातील सर्वसाधारण क्रम पुढीलप्रमाणे असतो :

| | |
|---|---|
| उद्देश्य (सब्जेक्ट) : | वाक्यविस्तारके (सर्कम्स्टन्सिज), आश्रय (सब्स्ट्रेट), विषय (थीम), विधेयविस्तारक (मॅनर), विधेय (प्रेडिकेट) |
| वाक्यविस्तारके : | परिस्थिती, काळ, स्थळ |
| आश्रय : | अपधान (टेनण्ट ऑव्ह सोर्स), निधान (टेनण्ट ऑव्ह साइट), आधान (टेनण्ट ऑव्ह डेस्टिनेशन) |
| विधेयविस्तारक : | स्थळ, काळ |
| विधेय : | विधेयपूरक |

ह्या क्रियासापेक्ष बीजघटकांपासून द्विस्तरीय रचना तयार होतात. पहिल्या स्तरामध्ये क्रियासापेक्ष प्रधानक आणि क्रियासापेक्ष गौणक ह्या दोन्हींचा समावेश असतो, तर दुसऱ्या स्तरामध्ये केवळ केवळ क्रियासापेक्ष प्रधानके असतात. क्रियासापेक्ष वाक्यरचनेचे उदाहरण पुढे पाहा :




आकृती क्र० १. मराठी वाक्याच्या क्रियासापेक्ष रचनेचे उदाहरण





अनुक्रमणिका

ग्रंथाच्या तिसऱ्या प्रकरणात वाक्याच्या संज्ञापनलक्ष्यी रचनेचे विश्लेषण केले आहे. हे विश्लेषण ज्यावर उभे आहे ते गृहीतक असे : भाषा-चिन्हांवर आधारित संज्ञापनाच्या प्रक्रियेत वक्ता श्रोत्याला एक संदेश पाठवण्याचा प्रयत्न करतो – संबोधित श्रोत्याकडून संदेशग्रहण झाल्यावर जीवनाच्या एखाद्या तुकड्याचे त्याचे आकलन संबोधितापर्यंत पोहोचेल अशा रीतीने. वक्त्याची अपेक्षा अशी की श्रोत्याचेही आकलन तसेच असेल. जर वक्ता आणि श्रोता एकाच भाषेचा वापर करत असतील आणि संज्ञापनाच्या संदर्भांची त्यांची कल्पना समान असेल तरच ही अपेक्षा सार्थ ठरेल. त्याच भाषेचा वापर ही एक आवश्यक अट आहे पण तेवढीच अट पुरेशी नाही. प्रत्येक भाषिक संज्ञापनात – मग ते बोललेले असो की लिखित – एक संबोधक (वक्ता किंवा लेखक) एक संबोधित (श्रोता/वाचक) ह्यांचे असणे आवश्यक आहे. पुढे भाषिक किंवा संज्ञापनात्मक व्यवहार तेव्हाच घडतो, जेव्हा हा व्यवहार दोघांच्या लेखी योग्य महत्त्वाचा (वर्थव्हाइल) आणि व्यवहार्य, सुसाध्य (फीझिबल) असेल. संज्ञापनाच्या आधीच वक्ता आणि श्रोता दोघांनाही संदेशाच्या काही भागाची माहिती असेल तरच हे संज्ञापन सुसाध्य ठरू शकते. ह्या आधीच माहिती असलेल्या संदेश-भागाला 'प्रकरण' (टोपोस – माहिती असलेली / पार्श्वभूमी / विषयाची प्राथमिक माहिती) अशी संज्ञा केळकरांनी सुचवली आहे. संज्ञापनाची गुणवत्ता (वर्थव्हाइलनेस) संदेशाचा उर्वरित श्रोत्याला माहीत नसलेला भाग त्याच्यापर्यंत पोहोचवण्याच्या वक्त्याच्या उत्सुकतेवर, इच्छेवर अवलंबून असते – ह्या उर्वरित संदेश-भागासाठी प्रस्ताव (स्क्रिप्टम – नवीन / पुरोभूमी) अशी संज्ञा वापरली आहे. संदेशाची पार्श्वभूमी आणि पुरोभूमी, प्रकरण आणि प्रस्ताव ह्यांच्यात मेळ हा संदेशाचाच एक भाग असतो. संज्ञापित वाक्याचा / संहितेचा संदर्भ हा एखादे व्याख्यान, भांडण, एखादी सहज भेट असू शकेल. संदर्भाच्या कल्पनेत संदेश-प्रेषक व संदेश-ग्राहक ह्यांच्यात किंवा एखाद्या तिसऱ्याच संवादकर्त्याबरोबर पूर्वी घडलेल्या संज्ञापन घटनेतील एखादा संदेश असू शकतो.








अनुक्रमणिका

संज्ञापनाची अशी पार्श्वभूमी दिल्यानंतर आणि वाक्याची क्रियासापेक्ष रचना उलगडून सांगितल्यानंतर वाक्याचे संज्ञापनसापेक्ष स्वरूप कसे असते याची स्थूल मांडणी केळकर करतात. वाक्याच्या उद्देश्याचा अंतर्भाव असलेला वाक्यातील प्रकरण हा भाग वाक्याच्या मध्यगत सीमकावर (सेंटेन्स मेडिअल जंक्चर) असणाऱ्या सूर-खंडाच्या (टोन ग्रुप) स्वरूपात संपतो. त्यानंतर विधेयाची सुरुवात होते. विधेयामध्ये उर्वरित क्रियासापेक्ष घटकांचा समावेश होतो. हा वाक्यभाग दुसऱ्या सूर खंडाच्या स्वरूपात येतो आणि वाक्याच्या अखेरच्या सीमकावर त्याचा शेवट होतो.

उदा॰ (१) चोराने मित्राला पिशवी दिली

(२) चोराने लगेच मित्राला पिशवी दिली

केळकरांनी नोंदवलेले एक निरीक्षण म्हणजे एखाद्या संज्ञापन-घटनेच्या (ही घटना एखाद्या संभाषणाच्या किंवा वर्णनात्मक/निवेदनात्मक वृत्तान्ताच्या स्वरूपात असू शकेल) शेवटच्या भागात ते संपूर्ण वाक्य पुरोभूमी (स्क्रिप्टम) किंवा नवीन संदेशाच्या स्वरूपात असू शकते. अशा वेळी संदेशाचा गृहीत धरलेला भाग हा अव्यक्त नाही पण गर्भित स्वरूपात असू शकतो. अशा परिस्थितीत पार्श्वभूमी ही संदेशाचा भाग असते पण खुद्द बोलण्याचा भाग नसते. पण वक्त्याने जर नवीन संदेश-अंश व्यक्त न करता राखून ठेवला तर श्रोत्याच्या लेखी ते वाक्य पूर्ण झालेले नसते. उदाहरणार्थ, "चोराने..." एवढाच शब्द वक्त्याने उच्चारला तर श्रोता विचारेल, "काय केले चोराने?" किंवा "त्याचं काय?". पुढे दिलेल्या आकृतीवरून वाक्याच्या क्रियासापेक्ष आणि संज्ञापनसापेक्ष रचनांचे सहअस्तित्व स्पष्ट होते.

वाक्य

|

| प्रकरण | प्रकरण केंद्र | प्रस्ताव | प्रस्ताव |
| --- | --- | --- | --- |
| \| | \| | \| | \| |
| उद्देश | आश्रय | कर्म | केंद्र |
| कर्ता | आधान | | |
| | | | क्रियापद |
| नाम | नाम | नाम | क्रियापद प्रकार |
| \| | \| | \| | \| |
| चोराने | मित्राला/ | पिशवी | दिली नाही का// ॥ |

/→ मंद-विषम-आरोह

//→ विषम सुर-आरोह

आकृती क्र॰ ३ : मराठी वाक्यात क्रियासापेक्ष आणि संज्ञापनसापेक्ष रचनांचे सहअस्तित्व



अनुक्रमणिका

थोडक्यात, चिन्हव्यवस्था हे वाक्याचे रूप आणि आशय ह्यांना एकत्र आणणारे भाषाविश्लेषणाचे प्रभावी साधन आहे. विवेचनाची मार्मिकता, विषयाची तर्कसंगत मांडणी आणि चपखल उदाहरणांची खैरात ह्यांमुळे भाषाविश्लेषणाचा आस्वाद व आनंद अभ्यासकांपर्यंत पोचवण्यात केळकर यशस्वी होतात.

■

**दीर्घायुषी 'रुजुवात'**

*रुजुवात* हे पुस्तक एका बैठकीत संपणाऱ्यातले अल्पजीवी पुस्तक नाही. ह्या दीर्घायुषी पुस्तकात जागोजागी जोरकस विचारांचे पुऱ्या जोमात वाढलेले भव्य आणि विस्तीर्ण वृक्ष आहेत, तशाच कुरळ्या केसांच्या खेळकर बटेइतक्या अल्लड अशा शब्दवल्लरी आहेत. फुलझाडे आहेत, फळझाडे आहेत. आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे आपल्या संस्कृतीतल्या अतिउत्तम अशा संस्कारांची बीजे इतस्तत: विखुरलेली आहेत. ती पटकन दिसत नाहीत. दिसली तर वेगवेगळ्या दृष्टींना बदलत्या रूपांत दिसतात. इथेच पुस्तकाच्या एकाच पानावर कबीर, कीट्स, कोलटकर सुखाने एकमेकांना शब्द पुरवतात. बोलाचीच कढी आणि बोलाचाच भात जेवून आपण तृप्त होतो. पलीकडच्या दालनात संगीताचे आणि नृत्याचे विविध प्रकार आपली पाळी कधी येते आहे ह्याची वाट बघताहेत. तर त्याच्या पलीकडे नाटकाची तपासणी आणि कानउघडणीही चालू आहे. नादमधुर आणि अर्थवाही शब्द तर सर्व कलांची सेवा करण्याकरिता सज्ज आहेत. चित्तसंस्कारिता, चित्तदीप्ती, चित्तद्रुती, चित्तविश्रांती असे ओळीने उभे राहिलेले शब्द आपल्या सेवेला हजर व्हावे आणि कायमचे बरोबर राहावेत असे न वाटणारा कलाकार किंवा कला कोण असू शकतो?

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)





अनुक्रमणिका



# भारतीय साहित्यशास्त्र आणि अशोक केळकर

द॰भि॰ कुलकर्णी

'प्राचीन भारतीय साहित्यमीमांसा : एक आकलन' हा डॉ॰ अशोक रा॰ केळकर ह्यांचा शोधनिबंध १९७९मध्ये पुणे विद्यापीठाच्या तत्त्वज्ञान विभागाने प्रकाशित केला आहे. त्याची किंमत आहे १० रुपये फक्त आणि पृष्ठसंख्या आहे ४+७८. प्रस्तुत शोधनिबंध परामर्श प्रकाशनमालेचे पहिले प्रकाशन असून ह्या मालेचे संपादक डॉ॰ सुरेंद्र बारलिंगे आहेत. सदर शोधनिबंध प्रा॰ दि॰के॰ बेडेकर ह्यांच्या स्मृतीस अर्पण केला आहे.

हा सर्व तपशील स्मरणात असणे आवश्यक आहे; कारण त्यावरून हे लक्षातच येते की प्रस्तुत लेखन साहित्यशास्त्राच्या सर्वसाधारण वाचकासाठी नसून तत्त्वज्ञानाच्या प्रशिक्षित अभ्यासकांसाठी आहे; सर्वसाधारण वाचकास ते अनाकलनीय किंवा क्लिष्ट वाटल्यास आश्चर्य वाटावयास नको. साध्या शब्दांत सांगावयाचे तर ज्ञानक्षेत्रातील एका विद्वानाने आपल्याबरोबरीच्या तशाच विद्वानांसाठी लिहिलेला हा शोधनिबंध आहे.

लेखकाची ही भूमिका लक्षात घेतली म्हणजे सदर शोधनिबंध कसा वाचावयाचा ह्याचे अचूक आकलन अभ्यासकांस होते.

१. अभ्यासकाचा भारतीय साहित्यशास्त्राचा दीर्घ आणि सूक्ष्म अभ्यास असला पाहिजे.
२. भारतीय साहित्यशास्त्राची परिभाषा त्याच्या अंगवळणी पडलेली असली पाहिजे.
३. ज्ञानशास्त्र व भारतीय दर्शने ह्यांचा त्याचा समाधानकारक अभ्यास असला पाहिजे.

अभ्यासकाची एवढी पूर्वतयारी असल्याशिवाय डॉ॰ केळकर ह्यांचा प्रस्तुत शोधनिबंध त्यास कळणे अवघड आहे. ह्यात भर म्हणजे डॉ॰ केळकर ह्यांची लेखनपद्धती. विषय आकलनसुलभ करण्याच्या त्यांच्या प्रयत्नातून त्यांचे लेखन अधिक गुंतागुंतीचे आणि विखंडित झाले आहे. जसे, त्यांनी सातत्याने वापरलेले कोनकंस, "हे आपण आधीच पाहिले आहे," पुन्हा "हे आपण पुढे पाहणार आहोत," इत्यादी त्यांचे इशारे, अधून मधून त्यांनी पाश्चात्त्य साहित्यविचाराचे दिलेले दाखले आणि प्रत्यक्ष विवेचनात संबंधित ग्रंथ, ग्रंथकार ह्यांचा निर्देश न करता शेवटी

टिपांमध्ये त्याचे विवरण करणे, क्वचित नर्मविनोद करणे ह्या साऱ्या प्रकारांमुळे डॉ॰ केळकर ह्यांचा प्रस्तुत शोधनिबंध जाणकार अभ्यासकांसही अनाठायी विस्कळीत आणि त्रोटक वाटतो. त्याचे स्वरूप सूत्रबद्ध लेखनासारखेही होत नाही की विवेचनात्मक निबंधाचे स्वरूपही त्यास लाभत नाही; शोधनिबंध वाचताना आपण संशोधनपर निबंध वाचत नसून एखाद्या महाग्रंथाची 'विवरणात्मक अनुक्रमणिका' वाचत आहोत असे वाटते. ह्यावर इलाज म्हणजे डॉ॰ केळकर ह्यांच्या एखाद्या शिष्योत्तमाने ह्या शोधनिबंधाच्या आधारे भारतीय साहित्यशास्त्रावर महाग्रंथ लिहिणे किंवा सदर शोधनिबंधाच्या आधारे सलग निबंध सादर करणे. दुर्दैवाने अशी ज्ञानपरंपराच मराठी विद्याक्षेत्रात आज अस्तित्वात नाही. ह्याची दोन उदाहरणे सांगतो : डॉ॰ ग॰त्र्यं॰ देशपांडे ह्यांचा 'भारतीय साहित्यशास्त्र' हा क्रांतिकारक ग्रंथ १९५८मध्ये प्रकाशित झाला. डॉ॰ देशपांडे ह्यांच्याभोवती डॉ॰ श्री॰भा॰ वर्णेकर, डॉ॰ मधुकर आष्टीकर, डॉ॰ के॰रा॰ जोशी, डॉ॰ रूपा कुलकर्णी असे संस्कृतचे मान्यवर अभ्यासक होते. परंतु ह्यांच्यापैकी एकानेही डॉ॰ देशपांडे ह्यांच्या विचारांचा विकास, विस्तार किंवा शुद्धीकरण केलेले नाही. दुसरे उदाहरण डॉ॰ रा॰भा॰ पाटणकर ह्यांचे. त्यांच्या सौंदर्य-मीमांसा ह्या १९७४मधील ग्रंथातील विचारांचा विस्तार किंवा विकास त्यांच्या एकाही समर्थकाने केलेला नाही. डॉ॰ पाटणकर ह्यांच्या भारतीय साहित्यशास्त्रविषयक प्रतिपादनाविषयी बोलायचे झाले तर ते पूर्णांशाने सदोष आहे. ह्याचे मुख्य कारण नवनवे भारतीय साहित्यशास्त्रीय ग्रंथ वाचणे पण त्या संदर्भातील मूळ ग्रंथांचा अभ्यास नसणे हे आहे. जसे, भारतीय साहित्यशास्त्रावरील त्यांचे प्रतिपादन डॉ॰ र॰पं॰ कंगले ह्यांच्या परिचयपर ग्रंथावर व डॉ॰ गो॰के॰ भट ह्यांच्या गाईडवजा पुस्तकावर आधारलेले आहे. प्रा॰ शरच्चंद्र मुक्तिबोध ह्यांनी 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' (लोकवाङ्मय गृह, मुंबई, प्रकाशन वर्ष नमूद नाही) ह्या ग्रंथात सौम्य शब्दांत डॉ॰ पाटणकर ह्यांची ही मर्यादा स्पष्ट केली आहे. पण डॉ॰ पाटणकरांच्या शिष्योत्तमांनी त्याची दखल घेतलेली नाही.

ही मराठी वैचारिक वाङ्मयाची अवस्था.

डॉ॰ केळकर ह्यांच्यासारख्या गंभीर अभ्यासकांस सुबोध लेखनासाठी क्लिष्ट लेखन करावे लागते ह्याचे कारण मराठी ज्ञानक्षेत्रात ज्ञानविकसन परंपरेचा अभाव हेच आहे.

डॉ॰ केळकर ह्यांनी आपल्या शोधनिबंधाची सुरुवात (१) पूर्वतयारी (२) प्राचीन भारतीयांचे वाङ्मयविश्व ह्या दोन उपविभागांनी केली आहे; त्याची गरज नव्हती. त्याऐवजी 'प्राचीन भारतीय दर्शने व प्राचीन भारतीय साहित्यशास्त्र' ह्यांच्यातील अनुबंध आणि विबंध ह्यांचा विचार अभिप्रेत होता. सुदैवाने प्रा॰

कृष्णराव अर्जुनवाडकर ह्यांनी The Rasa Theory and the Darsanas (annals-BORI, LXV, 1984) आणि An Epistemological Search into the Rasa Theory) (New Quest, Nov-Dec 1988) ह्या शोधनिबंधांत ह्या विषयाचा वेध घेतला आहे; त्यांत इतर अभ्यासकांच्या मतांचाही परामर्श आहे. डॉ॰ ग॰त्र्यं॰ देशपांडे ह्यांचा 'Abhinavagupta हा त्यांच्या निधनानंतर, साहित्य अकादमीने प्रकाशित केलेला (१९८९) ह्या विषयावरील महत्त्वाचा ग्रंथ. त्याचा डॉ॰ मिथिलेश चतुर्वेदी ह्यांनी केलेला हिंदी अनुवाद (१९९५) उपलब्ध आहे. डॉ॰ श्यामला मुजुमदार ह्यांचा मराठी अनुवाद मात्र अजून प्रकाशित झालेला नाही.

ह्यापेक्षाही महत्त्वाचा मुद्दा असा की अभिनवगुप्ताचार्यांनी शैवदर्शन आणि रससिद्धान्त – एकूणच भारतीय साहित्यशास्त्र ह्यांच्यातील अनुबंधच उकलून दाखविला असे नाही तर भारतीय साहित्यशास्त्रास स्वतंत्र दर्शनाचाच दर्जा मिळवून दिला.

हा विचार डॉ॰ केळकर ह्यांच्या शोधनिबंधात आलेला नाही; विषयानुरोधाने तो येणे आवश्यक होते.

मग डॉ॰ केळकर ह्यांच्या शोधनिबंधात काय काय आलेले आहे? तर प्राचीन भारतीयांची शास्त्रपद्धती त्यांनी दोन पानांमध्ये विशद केली आहे. ती त्यांनी डॉ॰ ग॰त्र्यं॰ देशपांडे ह्यांच्या 'भारतीय साहित्यशास्त्र' ह्या ग्रंथातून घेतलेली आहे. ह्याचा उल्लेख डॉ॰ केळकर ह्यांनी पृष्ठ ६१वरील टिपेत केलेला आहे. डॉ॰ देशपांडे ह्यांनी सांगितलेल्या (१) लक्ष्यानुसारी लक्षणम् (२) प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति (३) सिद्धपरमतानुवाद (४) यथोत्तरं मुनिनां प्रामाण्यम्. ह्या चतु:सूत्रीत डॉ॰ केळकरांनी आणखी दोन सूत्रांची भर घालण्याचा प्रयत्न केला आहे. ती सूत्रे अशी : (१) भिन्न भासणाऱ्या दोन घटकांचे एकाच तत्त्वाच्या आधारे स्पष्टीकरण करणे (पृष्ठ १२) (२) एकाच घटकाच्या संदर्भात दोन समबल स्पष्टीकरणे असतील तर त्यांतील वस्तुनिष्ठ स्पष्टीकरण प्रमाण मानणे. (पृष्ठ १२)

डॉ॰ केळकर ह्यांनी सांगितलेली ही दोन सूत्रे प्राचीन भारतीय शास्त्राच्या आकलनापुरती मर्यादित नसून तर्कशास्त्राच्या प्राथमिक तत्त्वांशी निगडित आहेत, हे कुणाच्याही लक्षात येईल.

'प्राचीन भारतीयांची वैचारिक उपकरणे' ह्या उपप्रकरणात लेखकाने लुडविग, व्हिटगनष्टाइन, इनपुट, आउटपुट, प्रोसेस इत्यादी आधुनिक संदर्भ देत भाव आणि क्रिया, अवस्था आणि व्यापार, स्थिती आणि गती व ह्यांना जोडणारी शक्ती (पृष्ठ १९) ह्या परिभाषेचा समाधानकारक खुलासा केला आहे. असे खुलासे लेखकाने जागोजाग केले आहेत. असे जर आहे तर प्रस्तुत शोधनिबंधाला सरळ 'संज्ञा-

संकल्पना कोश' असे स्वरूप दिले असते तर ते अधिक इष्ट झाले असते. ह्याचे उदाहरण म्हणून 'संकेतव्यापार आणि लिंगव्यापार हे चिन्हव्यापाराचे दोन प्रकार त्यांनी (प्राचीन भारतीय पंडितांनी) ओळखलेले दिसतात' (पृष्ठ २४) हे होय. संकेतित अर्थ, त्यावर आधारलेला लक्ष्यार्थ व व्यंग्यार्थ ह्यांचा खुलासा लेखकाने अकारण क्लिष्ट आणि संदिग्ध केला आहे (पृष्ठ २८). प्राचीनांनी तो किती मूलभूत आणि सुस्पष्ट पद्धतीने केला आहे, हे 'भारतीय साहित्यशास्त्र' ह्या ग्रंथातील ९-१३ ही प्रकरणे पाहिली म्हणजे थक्क व्हायला होते. डॉ॰ केळकर ह्यांनी भारतीय साहित्यशास्त्र ह्या बीजग्रंथाचा पांक्त अभ्यास करून आपला शोधनिबंध लिहिला असता तर तो त्यांचा प्रयत्न आजच्यापेक्षा कितीतरी प्रासादिक आणि मूलगामी ठरला असता.

भारतीय साहित्यशास्त्रासंबंधी प्रा॰ द॰के॰ केळकर, प्रा॰ रा॰श्री॰ जोग, प्रा॰ गंगाधर गाडगीळ, डॉ॰ के॰ना॰ वाटवे, डॉ॰ रा॰शं॰ वाळिंबे, डॉ॰ गो॰के॰ भट, डॉ॰ रा॰भा॰ पाटणकर, प्रा॰ नरहर कुरुंदकर, डॉ॰ वा॰म॰ कुलकर्णी एवढेच नव्हे तर प्रा॰ दि॰के॰ बेडेकर ह्यांनी जे विवेचन केले आहे ते किती सदोष आहे हे एव्हाना स्पष्ट झाले आहे. सुदैवाने डॉ॰ ग॰त्र्यं॰ देशपांडे, प्रा॰ अरविंद मंगरूळकर-कृ॰श्री॰अर्जुनवाडकर, डॉ॰ भालचंद्र नेमाडे, डॉ॰ श्यामला मुजुमदार व काही प्रमाणात डॉ॰ स॰रा॰ गाडगीळ असे विद्वान मराठीला लाभले हे आपले भाग्यच होय. सदर वस्तुस्थितीचे भान डॉ॰ केळकरांच्या लेखनात दिसत नाही.

रससिद्धान्ताचा ज्ञानशास्त्रीय मूलाधार साधारणीकरणाची प्रक्रिया हा आहे, हेच डॉ॰ केळकर ह्यांच्या लक्षात आलेले नाही. सोप्या शब्दांत सांगावयाचे तर व्यवहारातील ज्ञानप्रक्रिया सामान्याकडून विशेषाकडे जात असते व म्हणूनच व्यवहारात आपण एकमेकांशी व विविध वस्तू, प्रसंग ह्यांच्याशी देवाण-घेवाण करू शकतो; ह्याच्या उलट कलानिर्मितिक्षेत्रात आपण विशेषाकडून सामान्याकडे जात असतो, त्यामुळे तेथे व्यावहारिक क्रिया, देवाणघेवाण शक्यच नसते. तेथे फक्त प्रतीतिविश्रांतीच शक्य असते. आनन्दवर्धनाचा शब्द वापरावयाचा तर तेथे फक्त स्वरसरंजनच अपेक्षित व शक्य असते. जेथे ही प्रक्रिया अपुरी, सदोष किंवा अनुपस्थित असते तेथेही हा सिद्धान्त 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' ह्या न्यायाने लागू पडतोच. जीवन सौंदर्याचा, ललित कलाकृतीचा आणि साहित्यकृतीचा आस्वाद लोक कसा घेतात हा प्रश्न नसून त्यांनी तो आस्वाद कसा घ्यावयाचा असतो हा प्रश्न आहे. ह्या प्रश्नाचे बिनतोड उत्तर अलौकिकतावादाने दिलेले आहे. म्हणूनच अलौकिकतावाद आणि लौकिकतावाद ह्या सवती-सवती नसून बहिणी-बहिणी आहेत, हे लक्षात ठेवले पाहिजे. फक्त लौकिकतावाद ही धाकटी आणि ठेंगणी बहीण आहे! साधारणीकरणाची प्रक्रिया सोडली तर लौकिकतावादाचे सर्व धर्म अलौकिकता

वादाने लौकिकतावादाकडूनच घेतले आहेत. एव्हढेच नव्हे तर लौकिकतावादामध्ये व्यक्तिविशिष्टता, वस्तुविशिष्टता, क्रियाविशिष्टता ह्या ज्या आस्वादसापेक्ष मर्यादा आहेत त्या ओलांडून अलौकिकतावादाने त्यांच्या जागी अंतिम जीवनमूल्यांची स्थापना केली आहे. म्हणजे सौंदर्यानुभूती ह्याचा अर्थ वास्तवता (लोकयात्रानुगामित्व), जीवनमूल्य (धर्म-अर्थ-काम-मोक्ष उर्फ समता-शोषणमुक्तता-व्यक्तिस्वातंत्र्य-सर्वंकष स्वातंत्र्य), ह्या सार्‍यांचा आस्वाद असाच अर्थ अलौकिकतावादास अभिप्रेत आहे. ह्यापैकी समता-शोषणमुक्तता इत्यादी शब्द प्राचीनांचे नसून आजच्या वाचकांसाठी योजिले आहेत. प्रा॰ मुक्तिबोध ह्यांनी त्याऐवजी मनुष्यता ही संज्ञा वापरली आहे. पुरुषार्थनिष्ठ आणि मनुष्यता हा संज्ञाभेद समाजशास्त्रीय संज्ञाभेद असून त्यामुळे साहित्यशास्त्रीय भूमिकाभेद निर्माण होत नाही. ह्या संदर्भात वाचकांनी सिद्धपरमतानुवाद ह्या सूत्राचा आधार घ्यावा. ही सर्व ज्ञानशास्त्रीय प्रक्रिया वगळून डॉ॰ केळकर अलौकिकतावाद, मध्यम मार्ग आणि लौकिकतावाद ह्यांचा विचार अखेरच्या 'उपपत्तिभेदांचे स्वरूप' ह्या उपप्रकरणात करतात तेव्हा त्यांचे विवेचन केवळ त्रोटकच नव्हे तर सदोषही होते. (पृष्ठ ४६-५४)

साधारणीकरण केवळ रसिकाच्या भूमिकेचेच होत नसते तर कलाकृतीतील सर्व घटकांचे व कलावंताच्या भूमिकेचेही होत असते, हे समजणे फार महत्त्वाचे आहे. एका व्यासंगी उमेदवार महिलेने मुलाखतीच्या दरम्यान कलावंताचे साधारणीकरण आणि रसिकाचे साधारणीकरण ह्यांचे अचूक स्पष्टीकरण केले. त्यावर पृच्छकाने तिला प्रश्न विचारला की, "कलाकृतीचे साधारणीकरण होते का?" आश्चर्याने पाहात तिने उत्तर दिले, "शब्दांचे, नटांचे साधारणीकरण सर होईलच कसे?" ह्यावर पृच्छक फक्त हसला होता. कलावस्तूचेही साधारणीकरण होत असते; अहो, तसे ते झाले नाही तर कलावंताची साधारणीकृत कलावस्था रसिकांपर्यंत पोहोचेलच कशी? कलाकृतीचा व्यंग्यार्थ म्हणजे साधारणीकृत अर्थ. साधारणीकरण ही व्यावहारिक ज्ञानग्रहण प्रक्रियेशी समांतर पण स्वतंत्र अशी प्रक्रिया आहे, म्हणून तर व्यवहार आणि शास्त्र ह्या क्षेत्रांतील परिभाषा टाळून साहित्यशास्त्र भाव-विभाव-अनुभाव, रस-रसाभास-रसभंग, सहृदय-प्रतीतिविश्रांती-चारुत्व-आल्हाद अशी परिभाषा वापरते; कर्ता-कारण-कार्य किंवा ज्ञाता-ज्ञेय-ज्ञान अशी परिभाषा वापरत नाही. कलावंत, कलाकृती आणि रसिक ह्यांची जाणीव एकवर्गीय होते तेव्हाच रसिकास रसप्रत्यय येतो.

बापरखुमादेविवरू हृदयीचा जाणुनी ।
अनुभव सौरसू केला ।।
दृष्टीचा डोळा पाहो मी गेली ।
तव भीतरी पालटू जाला ।।

असा प्रत्यय येतो. तो ब्रह्मास्वादस्वरूप असतो. रसिकाचा रसप्रत्यय मात्र ब्रह्मास्वादाच्या धाकट्या भावासारखा असतो आणि तो चारुत्वगंगेला मनोमन म्हणत असतो,

या गंगेमधि गगन वितळलें,
शुभाशुभाचा फिटे किनारा;
असशिल जेथे तिथे रहा तूं,
हा इथला मज पुरे फवारा !

ज्ञानेश्वरांसारख्यांच्या अनुभूतीत व निर्मितीत ब्रह्मप्रत्यय व रसप्रत्यय एकरूप का व कसे होतात, ते समजायला प्रत्यभिज्ञ दर्शनच समजून घ्यावे लागेल!

"सुरुवातीला मी काही कच्ची त्रुटित टिपणे स्वतःपुरती काढली होती" (लेखकाचे मनोगत) असे डॉ॰ केळकरांनी म्हटले आहे. त्र्यं॰शं॰ शेजवलकर ह्यांचे 'शिवचरित्र' आणि दुर्गा भागवत ह्यांचे 'अस्वल' हे दोन्ही ग्रंथ मुख्यतः टिपणप्रधान ग्रंथच आहेत; पण त्या ग्रंथांना त्यांच्या प्रतिपादनाच्या संदर्भात जशी पूर्णता आली आहे तशी पूर्णता 'प्राचीन भारतीय साहित्यमीमांसा : एक आकलन' ह्या शोधनिबंधास आलेली नाही.

असे व्हायला नको होते.

■

**भाषा व संस्कृतीबद्दल माया, तळमळ**

विचार, अभिरुची, कुतूहल, माणुसकी आणि मानवी जीवनातल्या सर्वप्रकारच्या विचारविकारप्रकटीकरणावर इतक्या आत्मीयतेने केलेले लिखाण (*रुजुवात*) मराठीतच काय पण मला ज्ञात असलेल्या कोणत्याही भाषेत फार कमी वेळा वाचायला मिळाले आहे. आपल्या संस्कृतीबद्दल आणि भाषेबद्दल असलेली माया, तिच्या सकस वाढीची तळमळ, संस्कृतीच्या अनेक अंगांचे सखोल ज्ञान, उपजत आणि कमावलेली अभिरुची आणि विचारांची प्रचंड शिस्त हे सारे एका ठिकाणी क्वचित मिळते. महाराष्ट्रात एकंदर आढळणाऱ्या संकुचित आणि सपक अभिरुचीला आणि ढिसाळ विचार करण्याच्या प्रवृत्तीला अशोक केळकर हा एक सन्माननीय अपवाद होता.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)





अनुक्रमणिका



शैशवातच कलेचा अभ्यास?



डॉ० केळकर ह्यांचे प्राथमिक शिक्षण ज्या रमणबाग (पुणे) येथील न्यू इंग्लिश स्कूल येथे झाले, तेथील शिक्षकांच्या समवेत विद्यार्थी अशोक.



भारतातील विविध विद्यापीठांमध्ये भाषाविज्ञान विभाग सुरू करण्यास प्रेरणा मिळाली ती डेक्कन कॉलेजच्या भाषाविज्ञान विभागाकडून. म्हणजे दुसऱ्या शब्दांतअसं म्हणता येईल की डेक्कन कॉलेजचा भाषाविज्ञान विभाग ही भारतातील विविध विद्यापीठांमध्ये स्थापन झालेल्या भाषाविज्ञान विभागांची जननी ठरली. डॉ० केळकर (सर्वात पुढल्या रांगेत डावीकडून चौथे) ह्यांनी १९६२ ते १९८९ ह्या काळात भाषाविज्ञान शाखेतील रीडर तसेच उपयोजित भाषाविज्ञान विषयाचे प्रोफेसर म्हणून अध्यापनाचे कार्य केले. चित्रात डॉ० सुमित्र मंगेश कत्रे, डॉ० अमृत मा० घाटगे, डॉ० एच०एस० बिळीगिरी, डॉ० पी० भास्कर राव इत्यादी ज्येष्ठ भाषावैज्ञानिक व प्रोफेसर आपल्या विद्यार्थीवर्गासह दिसत आहेत.



डॉ० माधव देशपांडे (मिशिगन युनिव्हर्सिटी, ॲनआर्बर, यूयएसए) ह्यांनी साधारणत: सन १९९०मध्ये अजिंठ्याच्या लेण्याजवळ घेतलेले हे प्रकाशचित्र. त्यात डॉ० केळकर व श्रीमती दिशा केळकर, त्यांचे व्याही प्रा० पंढरीनाथ रानडे व त्यांच्या पत्नी श्रीमती सुमन रानडे, त्याचप्रमाणे डॉ० देशपांडे ह्यांच्या कन्या मधुश्री व मंजुश्री आहेत.



भारत सरकारने सन २००२मध्ये डॉ० केळकर ह्यांना पद्मश्री प्रदान करून त्यांनी केलेल्या भाषाविज्ञान, साहित्यशास्त्र वगैरे क्षेत्रांतील असामान्य कामगिरीचा गौरव केला.




डॉ० केळकर ह्यांनी वाङ्मयाची, कलेची आस्वाद-मीमांसा आणि समीक्षा इत्यादी विषयांवर व्यक्त केलेले विचार 'रुजुवात' ह्या ग्रंथात अभ्यासायला मिळतात. ह्या ग्रंथाला सन २०१०चा साहित्य अकादेमीचा पुरस्कार प्राप्त झाला.
(प्रकृतिअस्वास्थ्यामुळे हा पुरस्कार स्वीकारण्यासाठी डॉ० केळकर स्वत: उपस्थित राहू शकले नाहीत.)



सदैव चिंतनमग्न
डॉ० अशोक रा० केळकर



# संपादक अशोक केळकर

कल्याण काळे

डॉ॰ अशोक केळकर हे केवळ महाराष्ट्रातीलच नव्हेत तर भारतातील एक अग्रगण्य भाषावैज्ञानिक म्हणून विख्यात होते. भाषाविज्ञानाबरोबरच शैलीमीमांसा, सौंदर्यशास्त्र मीमांसा, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, नाट्य, संगीत, नृत्य, चित्र, कला इत्यादी ललित कला, साहित्य इत्यादी अनेक विद्याशाखांत त्यांचा व्यासंग होता. ह्या सर्व क्षेत्रांतील जुने-नवे प्रवाह, त्यांचे परस्परसंबंध इत्यादींचा त्यांनी बारकाईने अभ्यास केलेला होता. त्यांच्या ह्या बहुश्रुत व्यक्तिमत्त्वामुळे त्यांना ह्या निरनिराळ्या क्षेत्रांतील चर्चासत्रे, परिषदा यांमध्ये व्याख्यानांसाठी सन्मानपूर्वक बोलावले जाई. ही निमंत्रणे केवळ भारतापुरतीच मर्यादित नव्हती तर जगातील वेगवेगळ्या देशांतूनही येत असत. ते जिथे जातील तिथे त्यांच्या उपस्थितीचा दबदबा असे. अनेक परिषदा, चर्चासत्रे यांच्या आयोजनासाठी त्यांना सल्लागार म्हणून निमंत्रित केले जाई. अनेक क्षेत्रांत त्यांचा संचार असल्यामुळे ह्या सर्व क्षेत्रांतील विद्वानांशी त्यांचे मैत्रीचे संबंध होते. कोणत्या विषयासाठी कोणाला बोलवावे ह्यासंबंधीचा त्यांचा सल्ला अचूक असे. अनेक विद्यापीठांतील निवड समित्यांवर काम करताना त्यांची पारख योग्य असे.

डॉ॰ केळकरांचे व्याख्यान असो की अध्यापन असो, त्यामध्ये एक शिस्त असे. प्रत्येक विधान सप्रमाण, सयुक्तिक असे. ही शिस्त त्यांच्या सर्व कृतींमध्ये आढळून येई. आपल्या संग्रहातील पुस्तकांच्या नोंदी ते ठेवत असत. निरनिराळ्या विषयांतील संदर्भांच्या नोंदी त्यांच्याकडे असत. हीच शिस्त 'भाषा आणि जीवन' ह्या त्रैमासिकाच्या संपादनातही दिसून येत असे.

जानेवारी १९८२ साली मराठी अभ्यास परिषद ही संस्था स्थापन झाली. पाच-सहा महिने गेल्यानंतर मराठी अभ्यास परिषदेचे मुखपत्र असावे अशी गरज भासू लागली. तिची पूर्तता करण्यासाठी 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक सुरू करण्यात आले. मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष डॉ॰ केळकरच होते. ह्या त्रैमासिकाचेही डॉ॰ केळकरच मुख्य संपादक होते. त्या त्रैमासिकाच्या संपादन-समितीवर कल्याण काळे, अंजली सोमण, प्र॰ना॰ परांजपे, मॅक्सीन बर्न्सन अशी मंडळी होती. ह्या त्रैमासिकाची आखणी आणि उभारणी सर्वस्वी डॉ॰ केळकरांच्या कल्पनेतून साकार झाली. ती किती निर्दोष आणि चोख होती हे त्या त्रैमासिकाच्या पुढील काळातील यशस्वी








प्रवासाने सिद्ध झाले आहे. आज 'भाषा आणि जीवन'ने तेहेतीस वर्षे पूर्ण करून चौतिसाव्या वर्षात पदार्पण केले आहे. केळकरांनी पहिली सात वर्षे त्याचे संपादन केले. पुढे निरनिराळे संपादक येत गेले. पण त्या नियतकालिकाचा तोंडवळा तोच राहिला. केळकर संपादक म्हणून नसले तरी संपादक मंडळात होतेच. २००६ साली त्यांनी मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्षपद सोडले आणि 'भाषा आणि जीवन'च्या संपादक मंडळातूनही ते निवृत्त झाले. पण 'भाषा आणि जीवन'चे स्वरूप त्यांनी घालून दिलेल्या शिस्तीने चालू राहिले. पत्रिकेच्या वाचकवर्गात हे डॉ॰ केळकरांचे त्रैमासिक आहे अशीच त्याची ओळख राहिली. ह्या त्रैमासिकाला १९९५ साली महाराष्ट्र फाउंडेशनचे पारितोषिक मिळाले, त्यावेळी डॉ॰ केळकर मुख्य संपादक नव्हते, तरी ते केळकरांचे त्रैमासिक म्हणूनच मिळाले होते. केळकर त्या त्रैमासिकाशी किती एकरूप झाले होते हे ह्यावरून स्पष्ट होते. केळकरांनी ह्या त्रैमासिकाची पायाभरणी आणि जडणघडण कशी केली हेच आता पाहायचे आहे.

या त्रैमासिकाला 'भाषा आणि जीवन' हे नाव देण्यापासूनच ह्या जडणघडणीला प्रारंभ होतो. पहिला अंक १ जुलै १९८३च्या सुमारास प्रसिद्ध झाला, त्याच्या संपादकीयात केळकरांनी त्या नावाचे औचित्य स्पष्ट केले होते. असे जोडनाव स्वीकारण्यामागे त्यांचा एक विचार होता. जीवन आणि भाषा ह्या दोन गोष्टी वेगळ्या राहू शकत नाहीत. जीवन भाषेशिवाय वेगळे राहू शकत नाही आणि भाषेत जीवनाचे प्रतिबिंब पडल्याशिवाय राहात नाही. ह्या त्रैमासिकात केवळ भाषेचा विचार करायचा नाही तसेच केवळ जीवनदर्शनही घडवायचे नाही, तर जीवनाच्या संदर्भात भाषा जे विभ्रम प्रकट करते, आणि भाषा ही जीवनाला कसा घाट देते ह्या दोहोंचीही चर्चा ह्या त्रैमासिकाद्वारे व्हावी म्हणून हे शीर्षक निवडले गेले.

आता हे त्रैमासिक असल्याने दर तीन महिन्यांनी प्रकाशित होणार हा भाव स्पष्ट आहे. मग महिन्यांच्या नावानुसार त्या अंकाचा निर्देश न करता ऋतूंच्या नावावरून करण्याची कल्पना केळकरांचीच. तिच्यात नावीन्य तर आहेच, पण संपादकांना अंक तीन महिन्यांत केव्हाही काढला तरी चालेल असा भावनिक आधार मिळतो. केळकरांच्या ह्या कल्पनेनुसार 'भाषा आणि जीवन'चे अंक हिवाळा, उन्हाळा, पावसाळा आणि दिवाळी अशा ऋतूंच्या नावाने निघतात.

बऱ्याच वेळा काही नियतकालिकांत संपादक-मंडळातील सदस्यांची नावे दिली जातात. पण सर्व काम मुख्य संपादकच करताना दिसतात. 'भाषा आणि जीवन'च्या संपादक-मंडळातील सदस्यांनी आळीपाळीने संपादकीय लिहिलेच पाहिजे असा केळकरांनी दंडक घालून दिला. संपादक-मंडळातील ज्या व्यक्तींना लिहिण्याचा सराव नसेल त्यांना लिहिते करण्यासाठी हा उपक्रम खूपच परिणामकारक ठरला आहे.

'भाषा आणि जीवन' ह्या आपल्या मानसपुत्राला केळकरांनी वैविध्यपूर्ण सदरांचे कितीतरी अलंकार चढवून नटविले आहे हेही पाहण्यासारखे आहे : (१) संपादकीय (२) सहज जाता जाता (३) ज्याची त्याची प्रचीती (४) दखलपात्र (५) पुनर्भेट (६) भाषाविवेक (७) भाषापरीक्षण (८) शब्दकथा (९) शब्दायन (१०) विचार संकलन (११) देशीकार लेणे (१२) भाषावार्ता (१५) सूचना फलक (१६) ग्रंथ परीक्षण (१७) साद आणि प्रतिसाद (१८) धन परक्याचे (१९) पत्रिका सूची (२०) मराठीतली भाषालेखन सूची (२१) पानपूरके इत्यादी. अशी अनेक सदरे 'भाषा आणि जीवन'च्या अंकात वर्षानुवर्षे चालली. त्या सर्वच सदरांना वाचकांनी चांगला प्रतिसाद दिला आहे. अजूनही ही सदरे लोक आवर्जून वाचतात.

डॉ॰ केळकरांना निरनिराळ्या प्रकारच्या सूची तयार करण्याचा नाद होता. म्हणून त्यांनी स्वतः तर सूची केल्याच आणि इतरांच्याही सूची 'भाषा आणि जीवन'च्या निरनिराळ्या अंकांतून प्रसिद्ध केल्या. कोणा दिवंगत व्यक्तीवरच स्मृतिलेख लिहिला असेल तर लेखाच्या शेवटी त्याच्या लेखनाची सूची आवर्जून दिली जात असते. 'भाषा आणि जीवन'मधील काही महत्त्वाच्या सूचींचा निर्देश करणे अप्रस्तुत ठरणार नाही. (१) प्रा॰ प्र॰ना॰ परांजपे आणि वीणा मुळे यांनी केलेली अनुवादविषयक परिभाषा सूची (२) केळकरांनी केलेली ख्रिस्ती धर्मविषयक परिभाषा सूची (३) केळकरांनी केलेली कामजीवन शिक्षण परिभाषा सूची (४) डॉ॰ शं॰गो॰ तुळपुळे यांनी केलेली डॉ॰ सोन्थायमर लेखनसूची (५) डॉ॰ मु॰श्री॰ कानडे यांनी केलेली डॉ॰ शं॰गो॰ तुळपुळे यांच्या लेखनाची सूची (६) प्रत्येक वर्षाच्या शेवटच्या अंकात नियमाने प्रसिद्ध होणारी त्या वर्षातील मराठीतील भाषाविषयक लेखनाची सूची तसेच वर्षातील 'भाषा आणि जीवन'मधील लेखनाची सूची इत्यादी सूचींचा अभ्यासकांना उपयोग होत असतो.

मराठी भाषेची सेवा करणाऱ्या लेखकाच्या मृत्यूनंतर त्याच्यावरील स्मृतिलेख जाणकाराकडून लिहवून घेतले जातात आणि 'भाषा आणि जीवन'च्या अंकात ते प्रसिद्ध होतात. हा पायंडा डॉ॰ केळकरांनीच पाडलेला आहे.

'भाषा आणि जीवन'ने काही विशेषांकही काढले आहेत. भाषांतर ह्या विषयावर दोन विशेषांक निघाले आहेत. तसेच लोकशिक्षण ह्या विषयावरही दोन विशेषांक निघाले आहेत.

केळकरांचा विद्वज्जगताशी घनिष्ठ संबंध असल्यामुळे अनेक विद्वानांच्याकडून त्यांच्या त्यांच्या विषयावर मुद्दाम लिहवून घेतलेल्या लेखमाला हे 'भाषा आणि जीवन'चे वैशिष्ट्य ठरलेले आहे. त्यामध्ये (१) डॉ॰ अशोक दा॰ रानडे यांची





अनुक्रमणिका

नाट्यात्म भाषणावरील लेखमाला (२) श्री० अनिल झणकर यांची चित्रपटविषयक लेखमाला (३) डॉ० नीलिमा गुंडी यांची बालभाषेच्या विकासासंबंधीची लेखमाला (४) निरनिराळ्या लेखकांकडून लिहवून घेतलेल्या महाराष्ट्रातील थोर थोर विचारवंतांचे भाषाविषयक विचार सांगणारी लेखमाला इत्यादींचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. ह्याशिवाय जगातील मोठ्या भाषावैज्ञानिकांच्या जीवनकार्याचा आढावा घेणारी एक संकल्पित लेखमाला अर्धवट राहिली. पण तिच्यातील (१) डॉ० मिलिंद मालशे यांचे चॉम्स्कीविषयक लेख (२) प्रा० किंबहुने यांचा सोस्यूरवरील लेख ह्या लेखांचा निर्देश करणे आवश्यक आहे. (मोठमोठ्या लेखकांच्या लेखनातील भाषाप्रमादांकडे लक्ष वेधणारी अर्ध्यावरच सोडलेली लेखमाला, शालेय पाठ्यपुस्तकांतील मराठी भाषेवरील लेखमाला ह्यांचाही उल्लेख करावा लागेल.)

भाषा ही सामाजिक संस्था असल्यामुळे समाज व्यवहारात तिचे स्थान अटळ आहे. पण तिच्या स्वरूपात लिंग, वय, व्यवसाय, धर्म, सामाजिक दर्जा, व्यवहारक्षेत्र इत्यादींमुळे अनेक भेद निर्माण होतात. ह्या भेदांचा अभ्यास करून त्यांची कारण-परंपरा शोधणाऱ्या शाखेस समाजभाषाविज्ञान असे म्हणतात. समाजभाषाविज्ञान म्हणजे प्रत्यक्ष भाषाव्यवहाराचा अभ्यास. भिन्न क्षेत्रांतील भाषाव्यवहाराचा अभ्यास, भिन्न क्षेत्रांतील भाषाव्यवहारातील विविधता पाहणे खूप मनोरंजक ठरते. 'भाषा आणि जीवन'ने निरनिराळ्या अभ्यासकांनी केलेली भाषाव्यवहाराची निरीक्षणे प्रसिद्ध केली आहेत. ही निरीक्षणे म्हणजे समाजभाषाविज्ञानाचा दस्तऐवजच आहे. अनेक भाषाअभ्यासकांनी ह्या लेखांपासून प्रेरणा घेऊन त्या विषयावर लेखन केले आहे.

'भाषा आणि जीवन'च्या लेखकांमध्येसुद्धा परप्रांतीय आणि परदेशी लेखकांचा समावेश आहे. त्यांमध्ये मॅक्सीन बर्न्सन (अमेरिका), इरिना ग्लुश्कोव्हा (रशिया), श्याम विमल (दिल्ली), गुलाबदास ब्रोकर (गुजरात) ह्यांचा निर्देश करता येईल. ह्या सर्वांनी मराठीत लेख लिहिले आहेत. हे लेखक डॉ० केळकरांशी संबंधित आहेत. त्यांच्या लेखनाचा 'कुंपणाबाहेरचे मराठी' ह्या सदरात समावेश केला आहे.

वर समाजभाषाविज्ञान ह्या विद्याशाखेचा उल्लेख आला आहे. त्यामध्ये काही मजेदार लेखन 'भाषा आणि जीवन'मध्ये येऊन गेले आहे. त्यामध्ये मिलिंद संगोराम यांचा 'कॅथार्सिस याने निचरा' (कॉलेज तरुणांची कट्ट्यावरील भाषा), 'उपरी भाषा आणि थलकरी भाषा' (डॉ० केळकरांचा लक्ष्मण माने ह्यांच्या 'उपरा'तील भाषेवरील लेख), 'मायबोलीतील धक्के आणि हिसके' (डॉ० तारा भवाळकर यांचा तंजावर येथील मराठी समाजाच्या भाषेवरील लेख इत्यादी लेख) भाषेच्या व्यवहाराच्या नवीन क्षेत्रांचा परिचय करून देतात. 'भाषा आणि जीवन'मध्ये 'साद आणि प्रतिसाद' ह्या सदरामध्ये काही लेखांबद्दलच्या वाचकांच्या प्रतिक्रिया येत असतात. काही वेळा वाद-विवादांच्या फैरीही झडताना दिसतात. पण वाद फारसा चिघळू न

देण्याचे केळकरांचे धोरण असे. दोन्ही पक्षांच्या बाजू समजल्या की ते वाद थांबवत असत. काही वेळा आपले म्हणणे पुरेसे सांगता आले नाही म्हणून लेखक नाराजही होत असत.

'भाषा आणि जीवन'मध्ये 'अमुक लेख आवडला...' ह्या छापाची वाचकांची कौतुकपत्रे छापली जात नाहीत. हे धोरणही केळकरांचेच. पण ज्या वाचकपत्रात एखादा मुद्दा असेल ते पत्र मात्र आवर्जून छापले जाते.

केळकरांनी बीजारोपण केलेल्या 'भाषा आणि जीवन'च्या कोणत्याही अंकाची पाने थोडी चाळून पाहिली तरी त्यांमध्ये केळकरांच्या संपादकीय दृष्टिकोणाचा स्पर्श आढळतो. त्याचबरोबर भाषेच्या बहुरंगी आविष्काराचे दर्शनही घडते. केळकरांसारख्या महान भाषावैज्ञानिकाच्या नजरेने टिपलेला भाषेचा विस्तार म्हणजे 'भाषा आणि जीवन'चा आजवरचा हा प्रवास होय.

■

**विचारांची धार आणि तोल**

अनेक विद्वानांना आपल्या विद्वत्तेचे ओझे होते. ती न झेपल्याने तिच्या भाराखाली ते वाकलेले असतात. त्यांच्या चेहऱ्यावर एक वैचारिक स्मशानशांतता नांदत असते. एखाद्या तत्त्वप्रणालीच्या रचनेतले सौंदर्य, सौष्ठव, तिच्या पाणी दिलेल्या पोलादाप्रमाणे कणखर पण लवचीक रेषांची धार त्यांना हाताळता येत नाही. त्यामुळे ते ह्या धारेने तर्कबंबाळ, शब्दबंबाळ होतात. अशोक आपल्या विचारांची धार आणि तोल सहज संभाळत असे.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)





अनुक्रमणिका



# भेदविलोपन

सलील वाघ

केळकरांच्या सर्वच लेखनाचा बाज हा एखाद्या निष्णात वकिलाने कोर्टात केस उभी करावी, ती करताना त्या लेखाचा विषय हा आपला अशील आहे आणि वाचक हा न्यायाधीश आहे असे समीकरण मनात घोळवत, पंचनामे, न्यायवैद्यक चाचण्यांचे अहवाल, आधीच्या अन्य न्यायालयीन निर्णयांचे दाखले देत, परिस्थितीजन्य आणि कागदोपत्री पुरावे मांडत, त्या पुराव्यांना बोलते करत टप्प्याटप्प्याने निवाड्याकडे आणि निर्णयाकडे न्यावे तसा असायचा. त्यासाठी भाषाध्ययनाचे आंतरविद्याक्षेत्रीय नेपथ्यही चौकसपणे दिमतीला उभे दिसे. त्यामुळे त्यांचा कोणताही लेख सुटा किंवा पुस्तकरूपाने वाचताना एखाद्या जनहितयाचिकेच्या सुनावणीला हजर राहिल्याचा 'फील' येतो. त्यातून विषयाचे चौफेर भान वाचकाला मिळते. भेदविलोपन हे पुस्तकही याच स्वरुपाचे आहे. ह्या पुस्तकाचा (किंवा खरेतर पुस्तिकेचा) आवाका मोठा असला तरी जीव छोटा आहे. वास्तविक ही पुस्तिका म्हणजे मिस्टिसिझम ह्या इंग्रजी शब्दाच्या मराठी प्रतिशब्दाची शोधयात्रा आहे. ही शोधयात्रा आपल्याला संस्कृती, समाज, साहित्य, इतिहास, भूगोल, धर्म अशा विधांची धावती परिक्रमा करून आणते. एखाद्या शब्दाला परभाषेतून स्वभाषेत आणताना प्रतिशब्दाचा शोध आणि त्याच्या अर्थपरिसराचा वेध कोशकाराने कसा घ्यायचा असतो ह्याचा वस्तुपाठ त्यातून मिळतो.

ह्या पुस्तकाची वाचनसिद्धी चक्राकार आहे. पुस्तकाचे दोन ढोबळ भाग दिसतात. पहिल्या भागात भेदविलोपन संकल्पनेचे स्वरूप मांडले आहे आणि दुसऱ्या भागात ५० उदाहरणांचे पुष्टिपत्र दिलेले आहे. हे पुष्टिपत्र वाचून संपवल्यावर पुन्हा पहिला भाग म्हणजे मूळ प्रतिपादन वाचण्याची शिफारस केलेली आहे. अशा पद्धतीने विषयाला पूर्ण प्रदक्षिणा घातल्यावरच विषयदर्शन स्पष्टपणे होते.

मिस्टिसिझम ह्या शब्दाच्या निर्मितीतच मूळ गफलत आहे कारण गूढानुभव किंवा गूढता हा काही कोणता वाद किंवा मिशन असू शकत नाही असे केळकरांनी सुरुवातीलाच स्पष्ट केले आहे आणि ते पटण्यासारखेच आहे. रा०द० रानडे ह्यांच्या मध्ययुगीन भक्तिपरंपरेवरच्या / संततत्त्वज्ञानावरच्या एका पुस्तकाचे नावच 'मिस्टिसिझम इन महाराष्ट्र' असे आहे. कदाचित केळकरांच्या प्रतिशब्दशोधाची प्रेरणाही ह्या पुस्तकाच्या शीर्षकात असू शकेल. अशीच गफलत मराठी भाषांतरात








'गूढवाद' आणि हिंदी भाषांतरात 'रहस्यवाद' ह्या शब्दयोजनांमुळे झाल्याचे केळकरांनी नोंदवलेले आहे.

एखाद्या अनुभवक्षणी जग आणि आपण, परिसर आणि स्व यातल्या भेदाचा विलोप होणे, तो भेद लोप पावणे म्हणजे म्हणजे भेदविलोपन अशी भेदविलोपनाची साधी सुटसुटीत व्याख्या आहे. पण खरी गुंतागुंत पुढेच आहे कारण भेदविलोपन ही अनुभवधाटणी मानावी का जीवनपद्धती मानावी असा प्रश्न यातून निर्माण होतो. केळकरांनी त्याचे थेट उत्तर दिले नसले तरी त्या दोन्हींच्या बुडाशी असलेल्या मानवी प्रवृत्तीकडे निर्देश करुन ह्या गुंताळ्याची सोडवणूक करण्यासाठी एकात्मिक दृष्टिकोणाचा स्वीकार सूचित केलेला आहे.

भेदविलोपनाचे अनुभवक्षण अपवादात्मक आणि उत्कट असतात. ज्या भेदविलोपनसदृश अनुभवांना तितकी अपवादात्मकता नसते किंवा जे तितक्या तीव्रतेचे, उत्कटतेचे नसतात पण तरीही त्याच जातकुळीतले असतात, त्यांना 'प्राय-भेदविलोपी अनुभव' अशी संज्ञा दिलेली आहे.

या भेदविलोपी आणि प्राय-भेदविलोपी अनुभवांच्याही पुढे जगद्विलोपी आणि आत्मविलोपी अशा उपशाखा मांडून त्यांची प्रत्यंगे पुस्तकात न्याहाळली आहेत.

रतिभावाच्या उत्कर्षबिंदूपासून ते धार्मिक तपःसाधनेपर्यंत आणि निसर्गदृश्यांपासून ते अमूर्त गोष्टींपर्यंत अनेक सकारात्मक आणि नकारात्मक भावनांमधे, अष्टसात्त्विक भाव जागृत होण्यासारख्या गोष्टींपासून ते संमोहन, भ्रम, भास, व्यसन, उन्माद ह्यांसारख्या अनेक उत्कट भावानुभवांमधून ह्या भेदविलोपनाचा प्रत्यय येऊ शकतो. मर्यादामुक्ततेचा हा प्रत्यय एका बाजूने कलाव्यापाराला सुसंगत आणि सबळ करणारा असतो तर दुसरीकडे तो निव्वळ शारीर ग्रंथींचा जैवरासायनिक व्यापार असतो. पूर्वार्धाच्या पुष्टिपत्रात - उत्तरार्धात, विविध भाषांतल्या, धर्मांतल्या, काळांतल्या, मानववंशांतल्या, जगभरातल्या विविध ठिकाणांच्या उदाहरणांतून भेदविलोपनाचे संदर्भ वेचून केळकरांनी ह्या विषयाची व्याप्ती दर्शवलेली आहे. व्यासंगाचा असा विश्वकोशात्मक (एनसायक्लोपिडियॅक) आवाका मांडताना केळकर त्यात स्वतःची विचारसरणी किंवा मर्मदृष्टी घुसवत नाहीत किंवा लादत नाहीत. उलट वाचकाला स्वतःची मर्मदष्टी शोधण्याची सामग्री उपलब्ध करून देतात. ही केळकरांच्या एकूणच लिखाणाची मोठी जमेची बाजू आहे. कोशकाराने सत्याला स्वतःचा रंग न देता किती आणि कसे तटस्थ राहावे ह्याचे उदाहरण म्हणजे ही छोटेखानी पुस्तिका - भेदविलोपन!

■





अनुक्रमणिका



# भाषांतर – करावे की करू नये?

अशोक रा॰ केळकर
अनुवाद : अनघा भट

## भाषांतराची चौकट

भाषा-वापर-क्षमता म्हणजे भाषिक संज्ञापन-क्षमता होय. ती भाषेच्या रूपलक्षी क्षमतेपेक्षा वेगळी असते. (रूपलक्षी क्षमता म्हणजे एखादे वाक्य व्याकरणाच्या दृष्टीने चूक किंवा बरोबर हे ठरविण्याची क्षमता.) ग्रहण, निर्मिती आणि पुनर्निर्मिती ह्यांचा समावेश संज्ञापन-क्षमतेमध्ये होतो. पैकी पुनर्निर्मितीमध्ये आधी उल्लेख केलेल्या दोन बाबींचा (ग्रहण आणि निर्मिती ह्यांचा) थोडाफार अंतर्भाव असतो. सक्षम पुनर्निर्मितीमध्ये मूळ नमुन्याचे सक्षमतेने ग्रहण व त्यानंतर नकलेची सक्षमतेने निर्मिती या गोष्टी अनुस्यूत असतात. या दोन कौशल्यांप्रमाणे पुनर्निर्मितीसुद्धा चिन्हकाच्या पातळीवरील किंवा चिन्हिताच्या पातळीवरील असू शकते. ज्याप्रमाणे ग्रहण म्हणजे (आकलनाशिवाय) श्रवण किंवा वाचन असू शकते, त्याप्रमाणेच पुनर्निर्मिती (म्हणजे निव्वळ पुनरावृत्ती – किंवा श्रव्य चिन्हांची केवळ नक्कल) अथवा पुनरभिव्यक्ती म्हणजे रूप आणि आशय ह्या दोन्ही पातळ्यांवरील भाषेतील पुनर्घटन). औपचारिक शैलीतून बोली भाषेत समभाषिक अनुवाद हे त्याच भाषेत होणाऱ्या पुनर्घटनाचे उदाहरण आहे. या उलट भाषांतर हे आंतरभाषिक पुनर्घटनाचे, निदानपक्षी एकाच भाषेच्या दोन बोलींमध्ये होणारे पुनर्घटन आहे. त्याची व्याख्या पुढीलप्रमाणे करता येईल : एखाद्या भाषिक प्रणालीमध्ये असणाऱ्या संहितेची (स्रोत भाषेत अथवा बोलीत असणारी स्रोत संहिता) दुसऱ्या एखाद्या भाषिक प्रणालीमध्ये (लक्ष्य भाषा अथवा बोली) हुबेहूब प्रतिकृती.

अशा तऱ्हेच्या पुनर्निर्मितीमध्ये दोन भाषांचा अथवा बोलींचा दोन भाषिक प्रणालींचा सहभाग असल्याने गुंतागुंत निर्माण होते. जर या गुंतागुंतीची आपणांस जाणीव नसेल तर आपणांस असे वाटू शकते, की भाषांतर म्हणजे अर्थाच्या शरीरावरील कपड्यांचा एक जोड काढून टाकून दुसरा जोड घालणे इतकेच, बस! फ्रेंचमधील शेवा (cheval) म्हणजे इंग्रजीत हॉर्स (horse), पण शिएँ (chien) म्हणजे डॉग (dog). किंवा इंग्रजी स्रोत असेल तर बरोबर ह्याउलट.

ही साधी (आणि बालिश) रचना अशा पद्धतीने मांडता येईल :











स आणि ल म्हणजे अनुक्रमे स्रोत संहिता आणि लक्ष्य संहिता (प्रतिकृति). ही मांडणी एकाच भाषेअंतर्गत पुनर्घटन करताना (उदा॰ समभाषिक अनुवाद) थोडीफार कामाला येईल परंतु आंतरभाषिक पुनर्घटनासाठी (उदा॰ भाषांतर) तिचा फारसा उपयोग होणार नाही, हे लक्षात येणं म्हणजेच भाषांतर. हे काम कठीण आहे, त्यात तडजोडी कराव्या लागतात हे लक्षात येणं आणि मग इटालियनांप्रमाणे हताश होऊन "भाषांतरकार सगळे दगाबाज" असं म्हणणं आहे! मग भाषांतर अशक्य आहे असं म्हणून सोडून देण्याऐवजी आपण ही साधी मांडणी सोडून देऊ या. वास्तवाच्या अधिक जवळ जाणारी मांडणी अशी असेल:




भाषांतर करताना आपण दोन भाषांमधील अर्थाच्या अनुषंगाने जुळणारी रूपे जोडत नसून आपण दोन भाषांमधला अर्थही जुळवत असतो. अनेकदा एका भाषेत स्पष्टपणे वेगळे असणारे अर्थ दुसऱ्या भाषेत एकमेकांत मिसळलेले असतात. जसे इंग्रजीत drink water, eat bread व smoke cigarettes, तर बांग्लामध्ये वरील तिन्ही क्रियापदांचा निर्देश 'खा' या क्रियापदाने होतो. ह्याचा अर्थ असा नव्हे की बांग्ला भाषक पाणी अथवा सिगारेट्स खातात! आधुनिक बांग्ला भाषेत 'खा' हे इंग्रजीतील consumeच्या समकक्ष आहे. अर्थांची पुनर्मांडणी केली जाते. इंग्रजीतील He is hungry (तो भुकेलेला आहे) हे फ्रेंचमध्ये il a faim (त्याला भूक आहे) असे असते, तर he has cold feet फ्रेंचमध्ये il a froid aux pieds (शब्दशः, त्याच्या पावलांमध्ये गारठा आहे बनते. 'त्या रांगेतलं कितवं घर?' (शब्दशः, that row–in how-many-eth house?) हा मराठीतील प्रश्न इंग्रजी आणि फ्रेंचमध्ये बऱ्याच आडवळणाने भाषांतरित होऊ शकतो. 'जूठन' ही हिंदीतील संकल्पना मराठीत अगदी सहज उतरवता येते परंतु इंग्रजी अथवा फ्रेंचमध्ये ती इतक्या सहजतेने जात नाही. जसे (that which has been tasted by one person and thus rendered unfit for another's consumption by virtue of a taboo – said of a portion of food or drink and, by extension, said of



अनुक्रमणिका

spoons, cups, mouth pieces of musical instruments and the like). एका अर्थाकडून दुसऱ्या अर्थाकडे घेतलेली झेप (अर्थ 'स' → अर्थ 'ल') इथे एका संस्कृतीकडून दुसऱ्या संस्कृतीकडे घेतलेली झेप ठरते. सरतेशेवटी भाषांतरकार थोडी अधिक महत्त्वाकांक्षा दाखवून दोन रूपांमध्ये असणारी दरी सांधण्याचाही प्रयत्न करू शकतात. हिंदी आणि उर्दू ह्यांसारख्या एकमेकींशी पुष्कळ साधर्म्य असणाऱ्या भाषांमधील भाषांतर म्हणजे बऱ्याचदा लिप्यंतर (किंवा बोलीतील उच्चारांमधील आघात) इतकेच असते. अगदी कठीणतम पातळीवरही ते केवळ रूपिम बदलणे इतकेच असते. ब्रिटिश इंग्रजीतून अमेरिकन इंग्रजीत वाक्याचे भाषांतर करणे म्हणजे ध्वनींची अदलाबदल करून त्याच वाक्याची पुनरावृत्ती करणे असते. परंतु सैलपणाने बोलायचे तर जरी भाषा एकमेकींशी इतक्या मिळत्या जुळत्या नसल्या तरीसुद्धा दोन भाषांमधले अंतर सांधता येते. फ्रेंचमधील cela va sans dire हे इंग्रजीत शब्दशः भाषांतरित होऊन that goes without saying असे येते. [ह्या प्रकाराला फ्रेंचमध्ये अनुवादरूप उसनवारी (काल्क) अशी संज्ञा आहे.] अनुवादरूप उसनवारी अशा पद्धतीची सांधणी आपल्याला अशी मांडता येईल :

(४) रूप 'स' → अर्थ 'स'
↓
रूप 'ल' ← अर्थ 'ल'

जी भाषांतरे (३)कडून (४)कडे जाण्याचा यशस्वी प्रयत्न करतात त्यांना 'निकट भाषांतर' (close translation) असे संबोधता येईल. तर जी भाषांतरे हे करू शकत नाहीत त्यांना दूरस्थ भाषांतर (distant translation) असे म्हणता येईल.

एव्हाना ही बाब पुरेशी स्पष्ट झाली असेल की एका भाषेतील मूळ संहिता दुसऱ्या भाषेत एकापेक्षा जास्त तऱ्हांनी भाषांतरित होऊ शकते. तसेच भाषांतरकाराला सर्वच बाबी साध्य करणे शक्य होत नाही. एखादी बाब जर भाषांतरकार साध्य करत असेल तर त्यास दुसऱ्या एखाद्या बाबीचा त्याग करावा लागतो. तसेच एका भाषांतरापेक्षा दुसरे भाषांतर अधिक सरस अथवा कमी सरस असे म्हणता येते, ते त्या भाषांतराने काय साध्य करावे अशी आपली अपेक्षा असते त्या संदर्भातच. जर आपण His eyes are blue हे इंग्रजी वाक्य फ्रेंचमध्ये Il a les yeux bleus (he has the eyes blue) असे भाषांतरित केले तर अर्थाची फिरवाफिरव केल्याचा आळ आपणांवर येईल, परंतु फ्रेंचची सहज शैली राखल्याचे श्रेय आपणांस मिळेल. परंतु जर आपण इंग्रजी वळणाचे Ses yeux sont bleus हा पर्याय स्वीकारला तर आपण इंग्रजी रचनेशी अधिक प्रामाणिक असू, पण फ्रेंच शैली मात्र सफाईदार नसेल.




अनुक्रमणिका

त्यामुळे वोल्तेरने भाषांतरकारापुढे असणाऱ्या दुविधेची तुलना एखाद्या होतकरू वराशी केली यात आश्चर्य नाही. पत्नीप्रमाणेच भाषांतर हे एकनिष्ठ असते अथवा सुंदर असते; ते दोन्ही असणे संभवत नाही!

तर मग भाषांतराने काय साध्य करावे अशी आपली अपेक्षा असते, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. ग्रहणक्षमतेवर जास्त भर देणारी (decoding) भाषांतरे असू शकतात. अथवा निर्मिती क्षमतेला जास्त महत्त्व देणारी (re-encoding) भाषांतरे असू शकतात. निर्मिती कौशल्यांच्या दोन बाजूंविषयी अगोदरच उल्लेख आलेला आहे. स्रोत भाषेतील मूळ संहितेचे लक्ष्य भाषेत भाषांतर करणे म्हणजे खालील दोनपैकी एका प्रश्नाचे उत्तर देण्यासारखे आहे.

(५) (i) मूळ संहिता काय म्हणते? (याचे उत्तर decoding translation असे आहे. एका अर्थाने शब्दशः भाषांतर)

(ii) तीच गोष्ट आपण लक्ष्य भाषेत कशाप्रकारे म्हणू शकतो? (याचे उत्तर re-encoding translation) किंवा पुनर्निर्मिती म्हणजेच समकक्ष पर्याय असे आहे.)

पहिल्या प्रकारचे भाषांतर लक्ष्य भाषेत स्वीकार्य असण्याला फारसे महत्त्व देत नाही. (Ses yeux sont bleus हे ठीक आहे.) भाषांतर वाचताना 'हे भाषांतर आहे असे वाटत नाही' अशी स्तुती पुष्कळदा फक्त दुसऱ्या तऱ्हेच्या भाषांतराच्या बाबतीत योग्य ठरते. 'My mother's brother is here' हे 'मामा' ह्या मराठी शब्दाचे अधिक चांगले स्पष्टीकरण (decoding) आहे परंतु 'My uncle is here' हा पर्याय अधिक इंग्रजी वळणाचा आहे. (Mother's brother, do take me with you!' हा पर्याय पुनर्निर्मितीचा (re-encoding) होऊच शकत नाही. तसेच consume हे बांग्ला 'खा'चे स्पष्टीकरण असले तरीही आपल्याला eat, drink, smoke ह्यांचा समकक्ष पर्याय म्हणून विचार करावाच लागेल.

स्पष्टीकरणात्मक (decoding) आणि समकक्ष पर्याय (re-encoding) भाषांतरांमधील भेद या अगोदर उल्लेख केलेल्या निकट आणि दूरस्थ भाषांतरांमधील भेद ह्यांच्यात गल्लत न करण्याचे भान ठेवणे आवश्यक आहे. स्पष्टीकरणात्मक (decoding) भाषांतर हे निकट किंवा दूरस्थ दोन्ही असू शकते. तसेच समकक्ष पर्याय (re-encoding) भाषांतरसुद्धा निकट अथवा दूरस्थ असू शकते. तत्त्वतः एकूण चार शक्यता मानाव्या लागतात : स्पष्टीकरणात्मक (decoding) भाषांतर हे प्रामुख्याने स्रोत संहितेशी प्रामाणिक असते. समकक्ष पर्याय (re-encoding) भाषांतर हे प्रामुख्याने लक्ष्य भाषेशी प्रामाणिक असते. निकट भाषांतर हे संहितेच्या व्याकरणिक रूपाला तसेच शक्य तर स्वनिमांशी प्रामाणिक राहण्याचा प्रयत्न करते.

हे साध्य करताना निकट भाषांतर प्रक्रियेसाठी लहान घटक निवडते : जसे वाक्याऐवजी शब्द किंवा कडव्याऐवजी ओळ. तर दूरस्थ भाषांतर हे आशयाकडे जास्त लक्ष पुरवते आणि रूपाला स्वतःची काळजी घेऊ देते.

रोजच्या व्यवहारातील 'स्वैर' आणि 'प्रामाणिक' ह्या संज्ञांचा वापर फारसा काटेकोर नसतो. तो अशासाठी की 'प्रामाणिक' ही संज्ञा अनेकदा निकट (close) किंवा स्पष्टीकरणात्मक (decoding) किंवा दोन्हींसाठी वापरली जाते, तर 'स्वैर' म्हणजे दूरस्थ (distant) किंवा समकक्ष पर्याय (re-encoding) किंवा दोन्हींसाठी वापरली जाते. दैनंदिन वापरातल्या ह्या संज्ञांचा ऐतिहासिक उगम बहुधा युरोपातील भाषांतरांच्या व्यवहाराशी जोडलेला आहे. सुधारणा (रिफर्मेशन) कालखंडात श्रद्धाळूंसाठी श्रद्धावंतांनी केलेल्या बायबलच्या भाषांतरांना सुरुवात झाली, तर पुनरुज्जीवन (रेनेसाँसच्या) काळात ग्रीक व लॅटीनमधील अभिजात कृतींच्या भाषांतरांना सुरुवात झाली. स्वतः उत्तम भाषांतरकार असणाऱ्या ग्योथे व फ्रिडरिष श्लायरमाखर ह्या दोघांनी हे भाषांतराचे दोन आदर्श नमुने म्हणून वाखाणले आहेत. वायलांडच्या प्रशस्तीमध्ये ग्योथे लिहितो :

'भाषांतरकारांना दोन मार्गांनी जाता येते – एक मार्ग असा की कोणताही परका लेखक आपल्यापाशी घेऊन यावयाचा, ज्यायोगे आपण त्याला आपलाच मानू लागतो (समकक्ष पर्याय, re-encoding), तर दुसरा मार्ग असा की आपण परक्याकडे जावयाचे (स्पष्टीकरणात्मक, decoding) आणि त्याची परिस्थिती, त्याची बोलण्याची लकब, त्याच्या खासीयती आपल्याशा करून घ्यायच्या. (निकट, close).'

श्लायरमाखरची मांडणी ही ह्याचीच सुधारित आवृत्ती आहे :

'भाषांतरकार एकतर होता होईतो मूळ लेखकाला अजिबात त्रास न देता त्याला वाचकाच्या (स्पष्टीकरणात्मक, decoding) जवळ घेऊन जातो (निकट, close) अथवा वाचकाला अजिबात त्रास न देता (समकक्ष पर्याय, re-encoding) त्याला लेखकाच्या जवळ घेऊन जातो. (दूरस्थ, distant)'

### वाङ्मयाचे भाषांतर

वाङ्मयीन संहितेचे भाषांतर हे सर्वात कठीण असते. कारण वाङ्मयीन संहितेची निर्मिती तसेच तिचे ग्रहण ह्या दोन्ही क्रिया गुंतागुंतीच्या असतात. त्यामुळेच अर्थ 'स'कडून अर्थ 'ल'कडे जी झेप घ्यायची ती अवघड बनते.

पहिली गोष्ट म्हणजे अगदी ढोबळमानाने बघता रूप आणि अर्थ असणारी भाषिक संहिता आणि तिच्या मागे उभी असणारी वाङ्मयीन कलाकृती ह्या दोहोंमध्ये समन्वय घडवून आणणारी वस्तू म्हणजे शैली. निर्मात्याच्या दृष्टिकोणातून शैली

म्हणजे समोर असणाऱ्या संज्ञापनाच्या उद्दिष्टाला साजेसे माध्यम; तर ग्रहण करणाऱ्याच्या दृष्टीने शैलीची जाणीव होणे म्हणजे संहिता कशी तयार झाली ह्याची जाणीव होणे; त्यामध्ये आपल्याला रस का वाटतो ह्याचा कयास बांधता येणे. प्रत्येक भाषेत शैलीच्या काही परंपरा असतात. व्हिक्टोरिया राणीच्या जमान्यातील इंग्रजीमध्ये पुरुषांना घाम आला तर 'men sweated' परंतु स्त्रियांना आला तर 'ladies perspired' अशी रचना होत असे. अतिशयोक्ती कोणती ह्याबाबतच्या इंग्रजी आणि फ्रेंच ह्यांमधल्या चौकटी लक्षात येण्याइतपत भिन्न आहेत. या भिन्नत्वाची जाणीव नसलेला इंग्रज, फ्रेंच माणसाचे त्याला भेटल्यानंतरचे Je suis enchante! (मी मंत्रमुग्ध झालो (आपल्याला भेटून!) हे उद्गार फारच गंभीरपणे घेईल; तर इंग्रजांची सर्व गोष्ट संकोचाने मांडण्याची प्रवृत्ती माहिती नसलेला फ्रेंच माणूस इंग्रजांच्या Not too bad (बरे आहे!)मुळे नाराज होईल. (अमेरिकन इंग्रजीत Not too badचे भाषांतर अर्थातच fantastic अथवा super असे होईल!) कोणती भाषा वाङ्मयासाठी वापरावी आणि तिने दैनंदिन व्यवहाराच्या भाषेपासून कितपत अंतर राखून असावे ह्या बाबतीतही भाषांमध्ये भिन्नता आढळते. म्हणूनच इंग्रजीशी तुलना करता आधुनिक भारतीय भाषांमधील काव्य हे दैनंदिन वापराच्या भाषेपेक्षा अधिक वेगळ्या भाषेत लिहिलेले आढळते. वाङ्मयाचे चांगले भाषांतर ते, जे त्याचा अर्थ संपूर्णपणे भाषांतरित करते आणि स्रोत संहितेच्या संपूर्ण अर्थामध्ये तिची शैलीसुद्धा समाविष्ट करते.

इथे एक आक्षेप उपस्थित होऊ शकतो. तो म्हणजे शैली आणि तिचा भाषांतराशी संबंध ह्यांविषयी इथे जे काही म्हटले आहे ते केवळ वाङ्मयाच्या भाषांतरालाच लागू आहे असे नाही. सर्वच वाङ्मयीन संहिता शैलीनिबद्ध असतात परंतु सर्वच शैलीनिबद्ध किंवा कसबी संहिता वाङ्मयीन कलाकृती नसतात, ह्या आक्षेपामध्ये तथ्य आहे. कारण वाङ्मयीन भाषांतरात स्रोत भाषा आणि लक्ष्य भाषा ह्यांच्यातील शैलींमध्ये असणारे अंतर कमी करण्यापेक्षा जास्त काहीतरी घडत असते. पहिली गोष्ट म्हणजे काव्य मुळातच अभाषांतरणीय (untranslatable) असते. आणि दुसरी गोष्ट म्हणजे सर्वच वाङ्मय काव्याचा हा विशेष अंगी बाणवण्याचा प्रयत्न करत असते. ह्या प्रश्नाच्या मुळाशी जायचे तर पुण्यश्लोक राय ह्यांच्या 'गद्य कसे बनते?' ('फॉर्मेशन ऑव्ह प्रोज') (1962a-313) ह्या प्रश्नाचे उत्तर शोधण्याच्या प्रयत्नांचा धांडोळा घ्यायला हवा.

'दुविधेपासून सुरुवात करू. वक्ता आणि श्रोता ह्यांची कोणती (भाषिक) रूपे कोणता आशय व्यक्त करतात ह्याविषयी जर अजिबात एकमत नसेल तर भाषा ही अशक्य कोटीतील गोष्ट होऊन बसते. त्यांच्यांत संपूर्ण एकवाक्यता असेल तर

भाषेची गरजच उरत नाही. जोवर आपण तिच्यावर अवलंबून नाही तोवर आणि तरीही आपण भाषेवर जितके अवलंबून असतो तितक्या पुरतीच ती उपयोगाची ठरते. सुदैवाने ह्या विरोधाभासाची निःसंशयता हा एक आध्यात्मिक भूलभुलैय्या आहे. पण आपण भाषा ज्या प्रकारे हाताळतो त्यामधील द्वित्व अधोरेखित करण्याचे काम हे विधान करते. भाषेवरील अवलंबित्वात पद्धतशीर वाढ अशी काव्याची व्याख्या करता येईल आणि भाषेवरील अवलंबित्वापासून पद्धतशीर मुक्ती याला गद्य म्हणता येईल. म्हणजेच काव्यापासून दूर जाणे म्हणजे गद्य अशी आपण गद्याची व्याख्या करू शकतो.'

काव्याचे भाषांतर करणे अवघड का – जरी ते अशक्य नसले तरी – ते आता आपणांला कळेल. काव्याच्या शैलीमध्ये संज्ञापनाच्या उद्दिष्टांना अनुरूप अशी साधने डोळ्यांसमोर असणे म्हणजेच संज्ञापनाचे अंतिम उद्दिष्ट डोळ्यांसमोर असणे. तसेच संहितेपासून मिळणारा आनंद समजावून घेणे तसेच संहितेचा मनाला जाणवणारा पोत निश्चित करणे म्हणजेच संहिता कशी घडली ह्याचा मागोवा घेणे. गद्याचे यश (वरील अवतरण ज्यामधून उद्धृत केले आहे, ती चर्चा करताना पुण्यश्लोक राय ह्यांच्यासमोर प्रामुख्याने व्यवहारोपयोगी गद्य होते) हे संहितेचे रूप आणि अर्थ एकमेकांपासून सर्वस्वी वेगळे काढण्यात सामावलेले असते. (तांत्रिक संज्ञा हेच करू पाहत असतात.) तर काव्य आणि बरेचसे वाङ्मयीन गद्य ह्यांचे कलात्मक यश रूप आणि अर्थ ह्यांच्या एकीकरणात साठवलेले असते. त्यामुळेच कवितेचे भाषांतर अथवा समभाषिक अनुवाद सहजासहजी देता येत नाही. कवितेची फार फार तर पुनरावृत्ती करता येऊ शकते.

आता आपण आपल्या युक्तिवादाच्या पुढच्या टप्प्यावर येतो. वाङ्मयीन संहितेचे भाषांतर म्हणजे मूळ संहितेच्या प्रतिरूपनिर्मितीची कसरत नव्हे तर मूळ संहितेसकट मुळातल्या संपूर्ण संज्ञापन प्रक्रियेची पुनर्निर्मिती होय. नक्कल/प्रतिरूप संहितेची निर्मिती आणि तिचे ग्रहण म्हणजे नव्या संज्ञापन प्रक्रियेचा जन्म हा त्याचा परिणाम आहे. भाषांतरकार करत असलेल्या कामाचे स्वरूप रंगमंचावर नाट्य सादर करणाऱ्या चमूच्या कामासारखे आहे. दोन्ही गोष्टींचे स्वरूप अर्थनिर्णयात्मक असते. मूळ कलाकृतीच्या लेखकाला जशी वाचकाच्या प्रतिसादाची अपेक्षा असते तशीच अपेक्षा ठेवण्याचा अधिकार भाषांतरकारालाही असतो. इतकेच काय, पण मूळ संहितेच्या वाचकाकडून असणाऱ्या अपेक्षांपेक्षा भाषांतराच्या वाचकाकडून असणाऱ्या अपेक्षा नेहमीच जास्त असतात.

ह्याअगोदर आपण भाषांतरात असणाऱ्या चार पद्धतींची मांडणी केली.

(i) स्पष्टीकरणात्मक भाषांतर (decoding translation), (जे निकट पासून ते दूरस्थ पर्यंत कोणतेही असू शकते)

(ii)समकक्ष पर्याय भाषांतर (Re-encoding translation) (जे निकट पासून दूरस्थ पर्यंत कोणतेही असू शकते.)

इथे उदाहरण देणे गरजेचे आहे. विल्हेल्म मेइस्टर्स लेहरयार या ग्योथेच्या विख्यात कवितेतील इटलीसंबंधीच्या ओळी आपण उदाहरणादाखल पाहू

(७) जर्मनमधील स्त्रोत संहिता

Kennst du das Land, wo die Zitronen blühn?

इंग्रजीतील लक्ष्य प्रतिकृती :

(i) Do you know the country where the lemon-trees bloom?

(ii) Say, you know the land of the lemon-trees in bloom?

(iii) Knowest thou the land where the lemons bloom?

(iv) Know you the land of lemon blooms?

पहिले दोन पर्याय आपल्याला स्त्रोत संहिता काय म्हणते हे साध्या सरळ इंग्रजीत सांगतात. स्त्रोत संहितेतसुद्धा साधी जर्मन भाषाच वापरली आहे. ही दोन स्पष्टीकरणात्मक (decoding) भाषांतरे आहेत. उर्वरित दोन समकक्ष पर्याय (re-encoding) भाषांतरे आहेत, जी आपल्याला मूळ संहितेचे काव्यात्म समकक्ष पर्याय देऊ पाहतात. पैकी (iii) हा पर्याय नाद आणि शब्द ह्या दोन्ही बाबतीत अधिक जवळ जातो. संहितेच्या दोन्ही पर्यायांमध्ये land ह्या शब्दाचा वापर केलेला आढळतो. इंग्रजीमध्ये ह्या अर्थाने land ह्या शब्दाचा फारसा वापर होत नसला तरीही (Country हा ह्या अर्थाला सर्वात जवळचा समानार्थी शब्द आहे) land शब्द वापरल्याने नाद आणि लय दोन्ही राखले जाते. (iv) हा पर्याय (iii)पेक्षा अधिक दूरस्थ आहे आणि (ii) हा पर्याय (i)पेक्षा दूरस्थ आहे. Youच्या ऐवजी thouचा वापर आणि do ह्या साहाय्यक क्रियापदाशिवाय केवळ शब्दांचा क्रम फिरवून प्रश्नार्थक वाक्याची निर्मिती ह्या गोष्टी जुन्या इंग्रजी काव्यशैलीच्या जवळ जाणाऱ्या आहेत. मूळ जर्मनमध्ये ह्या गोष्टी नाहीत. ह्या बाबतीत तरी (iii) आणि (i) समकक्ष शैली ह्या उद्दिष्टापासून दूर जातात परंतु नाद आणि लय चांगल्या तऱ्हेने सांभाळतात.

अशा रीतीने भाषांतराच्या चार पद्धतींची आपण खातरजा केली तरीही वस्तुस्थिती अशी आहे की, निकट भाषांतर हे स्पष्टीकरणात्मक (decoding) भाषांतराला जवळचे असते, तर दूरस्थ भाषांतर हे समकक्ष पर्याय (re-encoding )

भाषांतराच्या जवळ जाते. ह्याचे कारण असे की ज्यावर निकट अथवा दूरस्थ भाषांतरातील भेद अवलंबून असतो व त्या रूपांतील फरक व आशयांतील फरक [ज्याची हाताळणी स्पष्टीकरणात्मक अथवा समकक्ष पर्याय (decoding/re-encoding) करतात] हे एकमेकांत घट्टपणे गुंतलेले असतात. मुद्दा क्र॰ (३)मधील आशयाचे साधे स्पष्टीकरण आपल्याला सांगते त्यापेक्षा कितीतरी जास्त प्रमाणात ते एकमेकांत गुंतलेले असतात. वर उल्लेखलेल्या चार पद्धतींची एकभाषिक अनुवादाच्या (paraphrase) संदर्भात पुनर्मांडणी करायची म्हटले तर दूरस्थ स्पष्टीकरणात्मक (distant decoding) भाषांतरापासून दूरस्थ समकक्ष पर्याय (distant re-encoding) भाषांतर आणि निकट समकक्ष पर्याय (close re-encoding) भाषांतरापासून निकट स्पष्टीकरणात्मक (close re-encoding) भाषांतर वेगळे काढणे अवघड ठरेल.

(META (Translators Journal vol. 30, No. 3, September 1985)च्या अंकात डॉ॰ अशोक रा॰ केळकर ह्यांनी लिहिलेल्या शोधनिबंधाच्या काही अंशाचे भाषांतर)

### भाषांतरकाराची टीप

मराठीतील भाषांतरविषयक लेखन पुष्कळदा कोणत्याही सैद्धान्तिक चौकटीशिवाय शब्दांच्या अर्थांच्या परिप्रेक्ष्यात फिरत असते. डॉ॰ अशोक केळकर ह्यांनी प्रस्तुत लेखात decoding (स्पष्टीकरणात्मक) आणि re-encoding व दूरस्थ (distant) हे दोन बिंदू निश्चित करून भाषांतरविषयक चर्चेला एक चौकट पुरवली आहे. रूप (form) आणि अर्थ किंवा आशय (meaning) ह्या दोन महत्त्वाच्या मुद्द्यांवर हे बिंदू आधारलेले आहेत. भाषेच्या संदर्भात अशी चौकट निश्चित करणे अतिशय महत्त्वाचे आहे. परंतु त्याबरोबर हे भान बाळगणे ही गरजेचे आहे, की ही चौकट चिरस्थायी, वज्रलेप व सदासर्वकाळ लागू पडणारी नाही. रूप आणि आशय यांचे परस्परावलंबित्व व त्यांची एकमेकांतील गुंतागुंत हा मोठा गहन विषय आहे. परंतु डॉ॰ केळकरांनी त्यांच्या विलक्षण शिक्षकी हातोटीने ही चौकट सोप्यातील सोप्या पातळीपासून ते काव्याच्या भाषांतरासारख्या अतिशय कठीण पातळीपर्यंत विस्तारली आहे. भाषांतर करू इच्छिणाऱ्यांना तसेच भाषांतर मीमांसा करणाऱ्यांना हा लेख उपयुक्त ठरेल असे वाटल्याने त्याचे भाषांतर केले आहे. जिज्ञासूंनी मूळ लेख जरूर पाहावा. मूळ लेखाच्या उर्वरित भागात डॉ॰ केळकरांनी शार्ल बोदलेरच्या मूळ फ्रेंच कवितेची चार भाषांतरे (अनुक्रमे ऑरी पेरी, केट फ्लोरेस, जॉर्ज डायलन व ज्याक लक्लर्क ह्यांनी केलेली) वरील चौकटीच्या कक्षेत

तपासली आहेत व भाषांतर करावे की करू नये? या प्रश्नाचे उत्तर वाचकांवर सोडले आहे.



## संदर्भ

BENJAMIN, Walter (1923) : "Die Aufgabe des Übersetzers". [The task of the translator : An Introduction to the Translation of Baudelaire's Tableaux parisiens.] Heidelberg. (In German.) E.-tr. in his : Illuminations. Ed., introd., Aredt, Hannah. Tr. Zohn, Harry, New York, Harcourt, Brace and World, 1968; London, Cape, 1970.

FORSTER, L. (1958) : Translation. In : Smith, A.H. (Ed.) : Aspects of Translation, London, Secker and Warburg.

GOETHE, J.W. von (1819) : Übersetzungen. In : Noten und Abhandlungen zu bessern Verständnis des west-östlichen Divans, West-Östlicher Divan, Stuttgart.

PRAWER, S.S. (1973) : Comparative Literary Studies : An Introduction, London, Duckworth. (Ch. 5 : Translation and Adaptation, pp. 74-98.)

RAFFEL, Burton (1971) : The Forked Tongue : A Study of the Translation Process, The Hague, Mouton.

RAY, Punya Sloka (1962a) : The formation of prose, Word 18, pp. 313-325. Rptd. in his : Language Standardization, The Hague, Mouton, 1963, pp. 138 ff.

RAY, Punya Sloka (1962b) : "A Philosophy of Translation", Babel 8, pp. 182-188.

SCHLEIERMACHER, Friedrich (1813) : "Über die verchiedenen Methoden des Übersetzens", Rptd. in : Storig, Hans Hoachin (Ed.) (1969), Das Problem des Übersetzens, Darmstadt.

TATE, Allen (1972) : The Translation of Poetry, Washington, D.C., The Gertrude Clarke Whittall Poetry and Liteature fund for the Library of Congress. Address (1-11), discussion (12-38), notes (38).





अनुक्रमणिका



# मराठी भाषा आणि संस्कृती : १९९७

अशोक रा० केळकर

.१.

सुमारे १५-१६ वर्षांपूर्वी मराठी भाषेला कुणीच वाली नव्हता. काही मंडळी तर म्हणत, की काय असं ठेवलंय तुमच्या त्या गांवढ्या मराठीत? माझा मित्र सदाशिव भावे याला 'ग्रीन कार्ड मानसिकता' म्हणत असे. त्या वेळी आम्ही काही समविचारी मंडळींनी मराठी भाषा नुसती जगली पाहिजे असं नाही तर ती अनेक अंगांनी फळली फुलली पाहिजे असं निग्रहानं प्रतिपादन करायला सुरुवात केली. त्या वेळी 'अंग्रेजी हटाव' म्हणणारा एक गट होता. त्याच्याशी आम्ही हातमिळवणी तर केली नाहीच, उलट असल्या आततायी मित्रांपासून मराठीला वाचवा असंही म्हटलं. (माझा एक तमिळ मित्र एकदा म्हणाला होता की संस्कृतला आणि हिंदीला शिव्या देण्यापेक्षा आणि इंग्रजीचे गोडवे गाण्यापेक्षा आम्ही तमिळ भाषेच्या भल्यासाठी जिव्हाळ्याने काम केलं असतं तर एव्हाना ती भाषा कुठच्या कुठे गेली असती - ते माझ्या पक्कं लक्षात राहिलं होतं) स्थिती किती वाईट होती याचा दाखला द्यायचा तर एक आठवण देतो - मला काहीजण म्हणत : तुमचं स्वतःचं इंग्रजी इतकं चांगलं आहे तर तुम्ही मराठीची बाजू का बरं घेता? मी त्याला म्हणायचा, इंग्रजीचं पाहुणी म्हणून अवश्य स्वागत आहे पण सासू म्हणून नाही. थोडक्यात सांगायचं तर, मराठीचा पक्ष घेताना आम्ही भावनांना आवाहन केलं नाही तर विचारांना हात घातला.

आज स्थिती खूप सुधारली आहे असं नाही. १९८० साली बारशीच्या साहित्यसंमेलनात मी म्हटलं की इंग्रजीचा भोळा सोस आणि इंग्रजीचा तिटकारा दोन्ही एकाच न्यूनभावाचे आविष्कार आहेत. आजही ते दिसतात. परंतु हेही खरं की स्थिती तितकी दारुण राहिलेली नाही. मराठीचा अधिक्षेप उघडपणे कुणी करत नाही. मराठीच्या बाजूनं बोलणाऱ्या मंडळींचं प्रमाण वाढलं आहे - पूर्वी मराठीकडे पाठ फिरवणारी किंवा तिच्या विरोधात बोलणारी काही मंडळीदेखील आम्हाला येऊन मिळत आहेत. 'भाषा आणि जीवन' त्रैमासिकाचं पंधरावं वर्ष चालू झालं आहे. शासनाला हळूहळू जाग येत आहे. शिक्षणव्यवस्थेत मराठीचं भलं व्हावं यासाठी शासनानं काय करावं असं तत्कालीन मुख्यमंत्री शरद पवार यांनी विचारल्यावर मी तत्काळ म्हटलं : एक, मराठी माध्यमाच्या शाळांमधलं इंग्रजीचं अध्ययन सुधारावं; दोन, इंग्रजी माध्यमाच्या शाळांमधलं मराठीचं अध्यापन सुधारावं, किंबहुना त्या विद्यार्थ्यांना शालान्त परीक्षेसाठी मराठी अनिवार्य करावं; आणि तीन, दीर्घकालीन








उपायांसाठी 'राज्य मराठी विकास संस्थे'ची स्थापना करावी. सांगायचा मुद्दा, या तीनही दिशांनी शासनानं कमी-अधिक पावलं टाकली आहेत. मराठीच्या पक्षपात्यांच्या वैचारिक आवाहनाला थोडंबहुत यश मिळत आहे. पण महत्त्वाचं म्हणजे बदलत्या परिस्थितीचा रेटा मराठीच्या बाजूनं आहे. महाराष्ट्रातला सत्ता-समतोल बदलत चाललेला आहे. मराठी भाषेकडे आणि साहित्याकडे प्रथम भारतीय आणि नंतर जागतिक संदर्भात पहायची आपल्याला सवय होत आहे - आपले कोणते अभिमान वृथा होते आणि कोणते रास्त आहेत याची आपल्याला जाण येत आहे. उदाहरणार्थ, मराठी रंगभूमीला इतर देशीविदेशी रंगभूमींकडून किती शिकण्यासारखं आहे हे कळलं. उलट, मराठी दलित साहित्यामुळे इतर भारतीय दलितांना आत्मनिवेदनाची प्रेरणा मिळाली आहे. पहिल्या जागतिक मराठी परिषदेपासून अनिवासी मराठी भाषकांचं लक्ष केवळ महाराष्ट्राच्या अर्थकारणाकडे नव्हे, तर मराठी भाषा आणि साहित्य यांच्याकडेही वळलं आहे. ग्रीन कार्ड मानसिकतेवर परस्पर उतारा मिळत आहे आणि नंतर लेखन होऊ लागलं आहे, आणि त्यामुळे आजच्या परिसंवादातल्याप्रमाणे विविध क्षेत्रांमधली मंडळी मराठीचा पक्ष घेऊ लागली आहेत.

एका ऐन मोक्याच्या वेळी हा परिसंवाद होत आहे. त्यासाठी दोन गोष्टी गृहीत धरल्या आहेत. एक म्हणजे मराठी भाषा जगणं इष्ट आहे आणि दुसरी म्हणजे तिचं हे जगणं धोक्यात आलेलं आहे. ही दोन्ही गृहीतकं तपासण्याची गरज आहे. मराठी भाषा जगणं का इष्ट आहे याची स्पष्ट कल्पना असल्याशिवाय ती कोणत्या स्वरूपात जगायला पाहिजे याची कल्पना आपल्याला करता येणार नाही. मराठी दुबळ्या स्वरूपात जगली तर त्या जगण्याला काय अर्थ आहे? मराठी भाषेला पूर्वीही कालानुक्रमे संस्कृत आणि फार्सी भाषेचा सासुरवास होता, आता इंग्रजीचा आणि काही अंशी हिंदीचा सासुरवास होत आहे. पूर्वीच्या काळी मराठी त्यातून सुखरूप बाहेर पडली, एवढंच नव्हे, तर त्या त्या भाषांमधून तिनं स्वतःचं पोषणही करून घेतलं. तीच क्रिया आजही कशी चालू राहील याचा विचार करावा लागेल. निरक्षर स्त्रीपुरुषांमुळे पूर्वी मराठी जगली (पंडितकवी मोरोपंतांनी नितान्तसुंदर स्त्रीगीतं लिहिली.) आजही जगत आहे. पण लोकांना निरक्षर न ठेवताही तोच कार्यभाग कसा साधता येईल याचा आपल्याला विचार करायचा आहे. थोडक्यात सांगायचं म्हणजे ही गृहीतकृत्यं मुळातून तपासून बघणं हा खुंटा हलवून बळकट करण्याचा प्रकार आहे. या दिशेनं विचार करायचा तर भाषा आणि संस्कृती यांच्या संबंधांचा आपल्याला मुळापासून विचार करावा लागेल.

आपल्याकडे विचार करण्याच्या दोनच पद्धती सध्या ठाऊक आहेत - एक, व्यवहाराच्या पातळीपुरता विचार करायचा आणि सैद्धांतिक विचारांची उपेक्षा करायची; दुसरी, सैद्धांतिक पातळीवर विचार ठेवून व्यावहारिक पातळीकडे दुर्लक्ष

करायचं. पण अशा अनुक्रमे आंधळ्या किंवा पांगळ्या पद्धतीनं का म्हणून विचार करायचा? संस्कृती आणि भाषा यांच्याबद्दल सैद्धांतिक भूमिका घेऊन आपण का सुरुवात करू नये? व्यवहाराची आठवण तर आपल्याला पदोपदी ठेवायचीच आहे.

.२.

'संस्कृती' या शब्दाची व्याख्या मी करत बसणार नाही. 'कल्चर' या इंग्रजी शब्दाला इतिहासाचार्य राजवाड्यांनी 'संस्कृती' हा प्रतिशब्द बनवला आणि रवींद्रनाथ ठाकुरांनी त्या काळात बंगालीत प्रचलित असलेला 'कृष्टी' हा प्रतिशब्द बाजूला सारून हा नवा मराठी शब्द आनंदाने स्वीकारला याची मी फक्त आठवण करून देतो. म्हणजे काय झालं पाहा - इंग्रजीच्या खिडकीतून एक नवी, उपयुक्त संकल्पना घेतली, पण तिच्याकडे आपण मराठीच्या डोळ्यांनी निरखून बघितलं. बंगाली भाषकांनी इंग्रजीमधलं 'ॲग्रिकल्चर'चं उपमान कायम ठेवलं होतं, तसं न करता राजवाड्यांच्या प्रतिभेनं भारतीय विचारातल्या 'संस्कार' या संकल्पनेशी या नव्या संकल्पनेचा सांधा जोडून दिला. माणसाच्या मनावर आयुष्यभर सतत होणाऱ्या बऱ्यावाईट संस्कारांच्या संचिताशी संस्कृतीचा सांधा जुळला हे फारच बरं झालं. मराठी भाषेचं यामुळे प्रदूषण न होता उलट पोषणच झालं. संस्कृतीचा स्वभाव स्पष्टपणे कळायला यामुळे मदत होते. संस्कृती ही घाऊक प्रकार नसून ती त्या त्या संस्कारांमधून बनत जाणारी गोष्ट आहे. हे संस्कार जसे मुद्दाम घडवले जातात तसे कळत-नकळत परिस्थितीमुळे आपोआपही घडतात. ते जसे सु-संस्कार असतात तसे कु-संस्कारही असू शकतात. ते स्वकीयांचे असतात तसे परकीयांचेही असू शकतात. झालेला संस्कार बुजून जाऊ शकतो, बुजून गेलेला संस्कार पुन्हा प्रकट होऊ शकतो.

भाषा हे या संस्कारांचं एक महत्त्वाचं माध्यम असतं. भाषेच्या मार्फत बोलणारा ऐकणाऱ्यावर कळत-नकळत संस्कार करत असतो. मात्र पुष्कळदा सामान्य सुशिक्षित माणसं समजतात त्याप्रमाणे, भाषा म्हणजे केवळ आपलं पूर्वनिश्चित मनोगत दुसऱ्याला कळवायचं म्हणजे संज्ञापनाचं साधन नसतं. त्याखेरीज, भाषा साधन असण्याच्या पलीकडे जाऊन माध्यम बनते - इतरांशी बोलता बोलता आपण स्वतःशीही बोलत असतो. आपलं मनोगत नेमकं काय आहे हे निश्चित करण्यामध्ये भाषेचाही वाटा असतो. भाषा हे कळण्याचं म्हणजे ज्ञापनाचं माध्यमही असतं. परिणामी, भाषेचा विकास आणि ती ऐकणाऱ्या आणि बोलणाऱ्या मंडळींचा बौद्धिक, भावनिक, नैतिक विकास हातात हात घालून होत असतो. मराठीचा विकास आणि महाराष्ट्राचा विकास यांना वेगळं काढता येणार नाही.

माझ्या एका मित्राच्या बाबतीत घडलेल्या प्रसंगामधून या काही गोष्टी स्पष्ट होतील. तो मला सांगत होता: माझ्या नातीला इंग्रजी माध्यमाच्या शाळेत न घालता

मराठी माध्यमाच्या शाळेत घालायचा मी आग्रह धरला. तो मानला गेला, पण त्यामुळे तिचा अभ्यास घेण्याची नैतिक जबाबदारी माझ्यावर आली. नातीला ध्रुवबाळाच्या गोष्टीचा धडा होता. त्यावर तिनं तर माझी उलटतपासणीच घेतली. सुरुची, सुनीती नावं तिच्या ओळखीची होती, पण उत्तानपाद हे कसलं नाव? राजाला दोन बायका कशा? एक आवडती, दुसरी नावडती हा काय प्रकार? ध्रुवबाळाला सावत्र आईनं राजाच्या मांडीवरून ढकललं, एवढा वेडेपणा करून ती आवडती कशी राहिली? मी म्हटलं, अगं तुझ्या बाईंना नाही का हे सगळं विचारायचं? ती म्हणाली, बाई काही सांगेनात म्हणून तर तुमच्याकडे आले विचारायला! मी मित्राला हळूच म्हटलं, नातीला मराठी माध्यमाच्या शाळेत घातल्याबद्दल तुला पस्तावा नाही ना झाला? इंग्रजीतून 'दि ष्टोरी ऑफ ध्रुवा' वाचल्यावर ती समजून घेण्यात तिची इतकी शक्ती खर्च झाली असती की हे नाठाळ प्रश्न तिच्या मनात आलेच नसते! त्यावर तो कसंनुसं हसून म्हणाला, पस्तावा नाही झाला, पण ... वाक्य अपुरंच राहिलं. या 'पण' मध्ये भाषा आणि संस्कृतीचे अनेक प्रश्न दडलेले आहेत.

एक, मित्राचा मराठी माध्यमाबद्दलचा आग्रह नातीच्या बाबतीत होता, नातवाच्या बाबतीत नव्हता. मित्र अंमळ जुन्या विचारांचा असल्यामुळे नातीला स्त्रीमुक्तीसारख्या, त्याच्या दृष्टीने द्वाड विचारांपासून वाचवायचं त्याच्या मनात होतं असं त्याच्या बोलण्यात आलं. एका लोककथेत मुलीच्या आणि सुनेच्या आहारात पक्षपात करणाऱ्या सासूची मला आठवण झाली. मुलीला भाताची पेज दिल्यामुळे मुलग्यापेक्षा तिचं सांस्कृतिक पोषण अधिक चांगलं झालं! दोन, आजोबांना हे सगळे प्रश्न विचारायची हिंमत तिच्यात कुठून आली? (वडील माणसांच्या समोर बोलण्याची आमची प्राज्ञा नव्हती ही प्रौढीनं सांगण्यासारखी गोष्ट नाही. बोलणं खुंटलं की बोलणाऱ्याचं मन आणि समाजाची संस्कृती खुरटते हे आमच्या कधी लक्षात येणार?) आजोबा जुन्या विचाराचे असले, तरी नात पाश्चात्त्य संस्कृतीमधून इंग्रजीच्या मार्फत आलेल्या, नव्या विचारांच्या वातावरणात वाढते आहे. तीन, ध्रुवबाळाबद्दल मराठीतून वाचल्यामुळे तिला तो ओळखीचा वाटला. त्या आस्थेमधून हे सगळे प्रश्न तिच्या मनात आले आहेत. चार, त्या प्रश्नांना तिच्या बाईंनी मनापासून तोंड दिलं असतं तर त्यांना कितीतरी इष्ट संस्कार मुलांच्यावर घडवता आले असते. इंग्रजी माध्यमात बाईंची तशी तयारी असती तरी हे सगळं करणं त्यांना शक्य झालं नसतं. मराठी भाषा जगणं मराठी भाषकांसाठी महत्त्वाचं आहे ते असं - आपल्यावर होत राहणाऱ्या संस्कारांची पारख करणं, चाचरत नव्हे, तर आत्मविश्वासानं, उथळपणे नव्हे, तर खोल पाण्यात शिरून, यामुळे शक्य होणार आहे. आणि ही संस्कारजन्य मराठी संस्कृती केवळ उच्चवर्णीय हिंदू पुरुषांची नव्हे, तर स्त्रियांची,

विविध स्तरांची, धर्मांची, शेजारच्या मंडळींची भागीदारी सामावून घेणारी ती एक संमिश्र, समावेशक संस्कृती असणार आहे.

मराठी भाषा जगणं इतर भारतीयांसाठीही महत्त्वाचं आहे. महाराष्ट्र जगला तरच भारत जगेल अशा अर्थाचा सेनापती बापटांचा भावोत्कट उद्गार मला इथे अभिप्रेत नाही. मराठी संस्कृती हे भारतीय संस्कृतीचं एक वेगळं वळण आहे. इतर प्रादेशिक संस्कृतींप्रमाणे तिच्याकडूनही काहीएक भर पडलेली आहे. इरावती कर्वे म्हणत त्याप्रमाणे मराठी संस्कृतीत उत्तर-दक्षिणेचा एक वेगळा संगम आहे, आणि काही बाबतींत ती उत्तर-दक्षिणेपेक्षा निराळी आहे. महाराष्ट्रात रयतवारी पद्धत असल्यामुळे इथे पार दबून गेलेले खेडूत नाहीत. इथे पत्नी पतीला कधी नमस्कार करीत नाही. इथे ब्राह्मण-संस्कृती आणि श्रमण-संस्कृती यांचा निर्मितिशील संघर्ष आहे. इथल्या भक्तीमध्ये शरण्यभावापेक्षा सख्यभावाला प्राधान्य आहे, देवळात भक्तांना दुरूनच पाहणारा देव इथे नाही, महंतांच्या वंशपरंपरा किंवा शिष्यपरंपरा चालवणाऱ्या आरामशीर गाद्या इथे नाहीत. भक्तीमध्ये बौद्धिक चर्चेचा आणि लोकशिक्षणाचा धागा मिसळलेला आहे. उत्तरेत कबीर एकटा पडला, इथे त्याला बरीच दोस्तमंडळी मिळाली असती. एकोणिसाव्या शतकातल्या भारतीय प्रबोधनाचा मराठी आविष्कार वेगळा आहे, त्यातून सकस वैचारिक गद्याची परंपरा इथे तयार झाली. वारकरी पंथाचं मूल्यांकन करण्याच्या निमित्तानं इथे एक धर्मसमीक्षा उभी राहिली. इथले शास्त्री-पंडितही आहिताग्नि राजवाड्यांसारखे किंवा केवलानंद सरस्वतींसारखे स्वतंत्र बाण्याचे. इथले ख्रिस्तीही मिशनऱ्यांशी वाद घालणारे. इथले परिवर्तनवादी वेगळ्या पद्धतीनं काम करणारे. दिवसा सूर्यग्रहणाचे अचूक वेध घेणारे पण संध्याकाळी ग्रहणपर्वाचे आचार पाळणारे दुभंगलेल्या व्यक्तिमत्त्वाचे वैज्ञानिक इथे मिळणार नाहीत. एक काळ असा होता की मराठी बाण्याचे सकस हिंदी चित्रपट महाराष्ट्राने भारताला दिले. (आज मात्र हिंदी चित्रपटांमधली निकस वळणं पकडणारे दरिद्री मराठी चित्रपट इथे निघतात.) अनेक प्रादेशिक संस्कृती हे भारताचं वैभव आहे असं अनंतमूर्ती म्हणतात ते योग्यच आहे.

.३.

मराठी भाषेचं जगणं इष्ट असलं तरी ते धोक्यात आलं आहे या दुसऱ्या गृहीतकाकडे आपण आता वळू.

मराठी भाषा मुळात अस्तित्वात कशी आली?

एक तर स्वाभाविकपणे निरंतर चालणाऱ्या भाषिक परिवर्तनातून. दुसरं म्हणजे उच्चारण, शब्दसंग्रह, आणि व्याकरण या तीनही स्तरांवर खोलवर जाणारे द्राविड संस्कार आत्मसात् करण्यातून (गुजराती आणि हिंदी यांच्यापासून मराठी किती वेगळी पडते यामुळे!) तिसरं म्हणजे स्थलांतर आणि वंशवृद्धी यामुळे लोकवस्ती

वाढल्यावर स्वाभाविकपणे होणारे प्रादेशिक विघटन आणि त्यातून उद्भवणारी प्रादेशिक अस्मिता. आणि चौथं म्हणजे मध्यंतरी निस्तेज झालेल्या नागर संस्कृतीचं पुनरुज्जीवन.

मराठी अस्तित्वात आली तेव्हापासूनच मराठीला महत्त्व देण्याचं कारणच काय या शंकेला तिला तोंड द्यावं लागलं आहे. अशी आव्हानं मराठी भाषेला नवी नाहीत. ज्ञानेश्वर, एकनाथ, महानुभाव चक्रधर यांसारख्या विविध भक्तिमार्गियांनी झेललेलं संस्कृतचं आव्हान, 'राज्यव्यवहारकोश' किंवा 'आज्ञापत्र' यासारखी रचना करून मराठी स्वराज्यानं झेललेलं फार्सीचं आव्हान, सुरुवातीच्या आंग्लविद्याविभूषितांनी शैक्षणिक आणि लोकशैक्षणिक पातळ्यांवर झेललेलं इंग्रजीचं आव्हान या ऐतिहासिक घटितांबद्दल आतापर्यंत बरंच बोललं गेलेलं आहे. त्याची पुनरुक्ती मी करत नाही. मला लक्ष वेधायचं आहे ते मराठीनं आपलं वळण न सोडता आपलं पोषण या आव्हानांमधून कसं करून घेतलं याकडे. संस्कृत शब्दभांडारातून मराठीनं मोकळेपणानं उसनवारी केली आहे. पंडिती काव्यात तर ती जाणवतेच, पण संतकाव्यातही ती जाणवत राहते. अगदी निरक्षर 'स्त्रीशूद्रादिकां'च्या मराठीतही कितीतरी संस्कृत शब्द पोचले आहेत हे पाहणी केल्यावर दिसून येतं. महानुभावांनी वैचारिक दर्जाची निर्मिती केली ती संस्कृतच्या अनुकरणातून. पुढे अव्वल इंग्रजीपर्यंत त्यात व्हावी तशी वाढ झाली नाही, तरी पत्रव्यवहारातून काही वैचारिकता दिसून येते. फार्सी किंवा इंग्रजी शब्द सरळ उसने न घेता त्यांना प्रतिशब्द बनवण्याची ऊर्मी मराठीला आली तेव्हा मराठीनं संस्कृतचा उपयोग करून घेतला. संस्कृतमधली राजप्रशस्ती आणि फार्सीमधली इतिवृत्तात्मक तवारीख यांच्या मिलाफातून मराठी बखर जन्माला आली. हौस, मौज, ख्याली, खुशाली, तबियत, ऐश, आराम, दोस्ती, जमाना इत्यादी शब्दांतून काही वेगळ्या सांस्कृतिक जाणिवा मराठीत आल्या. कायदा आणि न्यायव्यवहार यांची भाषा प्रथम फार्सीतून आणि नंतर इंग्रजीतून घडत गेली. इंग्रजीतून केवळ नवतंत्रज्ञान आणि विज्ञान आलं नाही, तर नवं सामाजिक-राजकीय तत्त्वज्ञान आलं - कधी शब्द आयात करून, कधी प्रतिशब्द योजून, कधी 'चळवळ' सारख्या जुन्या शब्दांना नवं सामर्थ्य देऊन. वैचारिक गद्यातून नवी वाक्यरचनाही कधी आली. 'मराठीचं जगणं इष्ट असलं तरी ते धोक्यात आलं आहे' हे इंग्रजी वळणाचं वाक्यच घ्या. खास मराठी वळणानं बोलायचं तर 'मराठी जगायला पाहिजे खरं, पण तिला धोका पोचणार आहे' असं काहीतरी म्हणायला लागेल. संस्कृत वैचारिक गद्यात ही वाक्यरचना कशी होईल हेही पाहावं. तुलना केल्यावर कदाचित जाणवेल की ते इंग्रजी वळण ही वैचारिक गद्याची गरज आहे, विदूषकी आणि टवाळी यांच्या पलीकडची आणि इंग्रजी वळण म्हणून तिला नाक मुरडण्याची गरज नाही. विनोद आणि शृंगार आणि इश्क यांच्यापेक्षा निराळा असा प्रेमाविष्कार ही इंग्रजीची

आणखी एक देणगी. आजही हिंदीमधून 'ठोस'सारखे किंवा उर्दूमधून 'माहोल'सारखे अर्थवाही शब्द मराठीत येत आहेत.

ही बाहेरून पोषकद्रव्यं घेण्याची क्रिया यापुढेही चालू राहील, चालू राहायला पाहिजे. संस्कृत तार्किक गद्याचा काटेकोरपणा आणि थेटपणा अजूनही घ्यायचा बाकी आहे. फार्सी गझल आणि उर्दू रोजमर्रा वळणाचं गद्य यातून बरंच घेण्यासारखं आहे. भावनांचा कृपणपणा आणि किरटेपणा आणि व्यापक सामाजिक फलकाचा अभाव यांतून मोकळं व्हायचं असेल, तर मराठीला हिंदीकडे वळायला पाहिजे - हिंदी वळणाची मराठी चित्रपटगीतं वा भावगीतं किंवा शरच्चंद्र मुक्तिबोधांचं कादंबरीत्रय ही तर नुसती सुरुवात आहे. इंग्रजीतून केवळ वैज्ञानिक परिभाषा आणि वैचारिक माहिती घ्यायची नाही आहे, तर वैज्ञानिक दृष्टीला अनुकूल अशा तटस्थ, काटेकोर, वस्तुनिष्ठ भाषासरणीचाही अंगीकार करायचा आहे. शालेय पातळीवर काय किंवा महाविद्यालयीन पातळीवर काय, भाषेच्या तासाला केवळ व्याकरणनैपुण्य किंवा साहित्यास्वाद शिकवायचा नसतो, तर भाषाव्यावहारनैपुण्य शिकवायचं असतं; नवे संस्कार घडवायचे असतात, मात्र नवे संस्कार म्हणजे नीरस बोधामृत पाजायचं नसतं. दुर्दैवानं आपल्या पाठ्यपुस्तक-निर्मात्यांना याची काही जाणीव किंवा जाण दिसत नाही. (आचार्य अत्र्यांच्या पाठ्यपुस्तकांची अजूनही आठवण काढावीशी वाटते.)

पण हे सर्व करताना मराठीची स्वाभाविक बलस्थानं, उदाहरणार्थ तिचा 'फटकळपणा', गमवायला नको. 'कन्झ्युमरीझम' शब्दासाठी हिंदीमधल्या 'उपभोक्तावाद'पेक्षा मराठी 'चंगळवाद' अधिक ओळख देणारा. भावना दुखवल्या जाणं हा एक पोरखेळच झाल्यामुळं प्रसारमाध्यमांच्या भाषेला एक जबर कोमटपणा येत आहे अशी मला धास्ती वाटते. भाषेची बलस्थानं म्हणजे केवळ शब्दसंग्रहाची बाब नाही, त्यासाठी वाक्यरचनेचाही विचार करायला हवा. भारतीय संस्कृतीचं स्थान जुन्या काळापासून एक अविभाज्य अंग राहिलं आहे ते म्हणजे जीवनाबद्दलची एक विशिष्ट जाणीव. माणसाचं चरित्र पाहिलं तर त्यातल्या कोणत्याही घटिताला दोन अंगं असतात ही ती अखंड जाणीव. एक अंग म्हणजे बाहेरच्या वस्तूच्या अधीन राहून काय ते भोगणं. दुसरं अंग म्हणजे आतल्या 'स्व'च्या अधीन म्हणजे स्वाधीन राहून काय ते करणं. साहजिकपणे पुष्कळदा दोन पर्यायी वाक्यरचना आपल्याला उपलब्ध असतात - एक, भोगवट्याची, दुसरी करतुकीची. जशी संस्कृतमध्ये 'मया ज्ञातम्' आणि 'अहं जानामि' अशी जोडी आहे, तशीच मराठीमध्येही – 'मला ठाऊक आहे' हा भोगवटा आणि 'मी जाणून आहे' हे करतूक. (इंग्रजीमध्ये मात्र 'I know' म्हणून भागवावं लागतं आणि तसं करताना भोगवट्याचं अंग काहीसं दुर्लक्षित राहतं.) अशीच इतर त्रिकं म्हणजे 'त्याला कारण समजलं : तो कारण समजला : he

understood the reason.'; 'त्याला ओझं पेललं : त्यानं ओझं तोललं : he balanced the load'; 'मला राग आला : मी रागावलो : I felt angry'; 'तिला त्याचं काही वाटलं नाही : तिनं त्याचं काही मानलं नाही : she didn't mind the thing'. या वारसा-हक्कानं आलेल्या जाणीवांपोटी आलेलं शहाणपण मग अगदी अशिक्षित बाईच्या तोंडूनही ऐकायला मिळतं : "पोराला परक्षेचं लई टेन्शन आलं पघा. पन म्यां म्हटलं, पोरा, आसं टेन्शन घिवू नगंस!" इथं 'टेन्शन' ही आधुनिक अनुभूती पारंपरिक शहाणपणानं कशी झेलली आहे ते बघावं. "अहो, उपकार कसले? माझ्या हातून मदत झाली एवढंच!" हा त्या शहाणपणाचा दुसरा नैतिक आविष्कार - त्याचा एक धागा थेट गीतेपर्यंत पोचणारा (अध्याय ११, श्लोक ३३ पाहावा). मराठीतून इंग्रजीत अनुवाद करताना हे बारकावे व्यक्त करायला इंग्रजीत कसा त्रास पडतो ते ध्यानात येतं. 'टेन्शन येणे' आणि 'टेन्शन घेणे' यातला फरक स्पष्ट होईल असा इंग्रजी अनुवाद करून पाहावा.

.४.

आपल्याला मराठी अवश्य जगवायची आहे, पण ती कशीबशी जगवायची नाही. ती अशी जगवायची आहे की ती एकाच वेळी देशी आणि आधुनिक वळण घेऊ शकेल, संस्कृत शब्दांच्या अतिरेकामुळे ती गुदमरून गेलेली नसेल, नवे विचार सोपे करून सांगण्याच्या नादात ती विचारांचा व्याप आणि खोली हरवून बसणार नाही. हे जर व्हायचं असेल, तर मराठीभाषक तज्ज्ञ, संशोधक, विचारवंत यांनी विविध विषयांवर, विशेषतः आपापल्या विषयांवर, बोलायला आणि लिहायला पाहिजे; सकस विचार पण दुबळी भाषा, किंवा डौलदार भाषा पण पोचट विचार असं होऊ नये याची काळजी वाहायला पाहिजे. आणि दुसऱ्या बाजूला सामान्य मराठी भाषकांनी जांभूळ तोंडात ढकलून द्या असं न म्हणता या मंडळींना अर्ध्या वाटेपर्यंत चालून सामोरं जायला पाहिजे. प्रकाशक, विविध संस्था, आणि शासन यांनी केवळ बघ्याची भूमिका न घेता या परस्परसंवादाला पोषक परिस्थिती उत्पन्न करायला पाहिजे. त्याच बरोबर उत्तम वैचारिक लेख आणि पुस्तकं यांचं परभाषांतून मराठीत आणि (आपण तशी उमेद बाळगू या) मराठीतून परभाषांत अनुवाद करायला उत्तेजन द्यायला पाहिजे. (या ठिकाणी परभाषा म्हणजे केवळ इंग्रजी नव्हे, तर फ्रेंच, जर्मन, अरबी, बंगाली, हिंदी अशा इतर भाषाही.)

मराठी भाषेला सलाइनवर ठेवायची वेळ आलेली नाही, पण टॉनिक द्यायची वेळ नक्कीच आलेली आहे - कणखर आत्मविश्वास आणि वास्तवाचं सजग भान हे ते टॉनिक.

■

## संदर्भ

अशोक रा॰ केळकर, 'राजभाषा मराठीचा वाद', महाराष्ट्र टाइम्स, १८ मे १९८०. समावेश : वैखरी : भाषा आणि भाषा व्यवहार, मुंबई : मॅजेस्टिक, १९८३.

व्यावहारिक मराठी : गरज, मागणी, पूर्ति. नवभारत ऑगस्ट-सप्टेंबर १९८१ जोड अंक विशेषांक म्हणून (डेक्कन कॉलेजमधील चर्चासत्र १९८१).

अशोक रा॰ केळकर, 'महाराष्ट्र राज्य शिक्षणक्षेत्रातील मराठी आणि इतर भाषांचे स्थान', मराठी अभ्यास परिषद पत्रिका, पावसाळा : १९८९. समावेश : मध्यमा : भाषा आणि भाषा व्यवहार, पुणे : मेहता प्रकाशन, १९९६.

उडुपि रा॰ अनंतमूर्ति, 'विविधता आहे, म्हणूनच भारत अजूनही टिकून आहे', साप्ताहिक सकाळ ३०-०३-१९९६ (इंग्रजी भाषणाचा मराठी अनुवाद : श्यामला वनारसे).

---

'(मराठी भाषा जगवायची कशी?' ह्या १९९७मधील परिसंवादासाठी लिहिलेल्या मूळ टिपणाची संस्कारित प्रत)

### दीर्घायुषी लेखन

अशोकचे संग्रहित लिखाण वाचल्यावर त्यातल्या लेखांच्या बेरजेपेक्षा अधिक असे काही हाती लागते, त्यातला प्रत्येक लेख तो ज्या वेळी प्रसिद्ध झाला त्या काळाच्या आणि प्रसंगाच्या मर्यादा ओलांडून आजही तितकाच धट्टाकट्टा आणि बोलका आहे हे लेखांचे पुनर्वाचन केल्यावर जाणवते. त्याचे लेख एकत्र वाचताना ते ज्या विशाल आणि श्रीमंत अभिरुचीचा, विचारशक्तीचा, सामाजिक मूल्यांचा आणि खरे तर एका जीवनदृष्टीचाच परिचय करून देतात तिची गरज आजच्या दिवाळखोर काळात अधिक प्रकर्षाने जाणवते.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)



# मनोगत : २००७

अशोक रा॰ केळकर

आजच्या प्रसंगी १९८२मध्ये स्थापन झालेल्या मराठी अभ्यास परिषदेच्या रौप्य महोत्सवाची सांगता आणि १९८३मध्ये चालू झालेल्या 'भाषा आणि जीवन' या तिच्या पत्रिकेच्या रौप्य महोत्सवाचा आरंभ आपण साजरा करीत आहोत, आणि त्याचबरोबर 'वैखरी : भाषा आणि व्यवहार' या माझ्या पुस्तकाचा नव्या आवृत्तीचं प्रकाशन आणि महाविद्यालयीन उगवत्या पिढीच्या लेखनाचं कौतुक साधत आहोत. या तीन्ही निमित्तांना धरून मी आपल्याशी थोडा वार्तालाप करायचं योजलं आहे. आलाप असल्यामुळे तो निबद्ध नसेल. त्यात जुन्या आठवणी, सभोवतालची नजर, नि नवे मनसुबे असतील.

त्याचं असं झालं, महाराष्ट्र शासनानं १९७९ राजभाषा वर्ष म्हणून जाहीर केलं अन मुंबईला एक परिषद बोलावली. मराठी भाषेची अधूनमधून आठवण न करता सरकारने एक स्थायी व्यवस्था म्हणून एक राज्य मराठी विकास संस्था स्थापावी, केवळ अनुदान किंवा पारितोषिके देणारी नव्हे, तर काम करणारी – अशी त्या परिषदेत केळकरांनी मांडणी केली. सरकारने ती तत्त्वतः मान्य केली, तपशीलवार योजना करून घेतली. पण ते मंत्रिमंडळ कोसळल्यामुळे ती बारगळली. नंतरची मंडळी काही करतीलसं दिसेना. तेव्हा प्र॰ना॰ परांजपे आणि मॅक्सीन बर्नसन यांनी विचार केला की अशी लहान प्रमाणावर का होईना, एक बिनसरकारी स्वयंसेवी परिषद स्थापून काही कामं चालू करावी. त्याप्रमाणे १९८२मध्ये मराठी अभ्यास परिषद स्थापन झाली, त्याच्या पुढच्या वर्षी त्रैमासिक पत्रिका चालू केली. मूळ ठिणगी टाकणारा केळकर म्हणून परिषदेचं अध्यक्षपद आणि पत्रिकेचं संपादकपद माझ्याकडे आलं.

परिषद आणि पत्रिका यांनी भाषेबद्दल केवळ भावनिक आवाहनावर विसंबून न राहता विचार करून जरूर तिथे आधुनिक भाषावैज्ञानिक चर्चेचा आधार घेऊन प्रश्न सोडवता येतात हे मराठीभाषक समाजातील विचारी लोकांना पटवून देण्याचा प्रयत्न केला, त्यासाठी भाषातज्ज्ञ आणि सामान्य जिज्ञासू मंडळी यांना एकत्र आणलं, मराठीभाषकांचा सगळ्याच भाषिक गरजांचा विचार केला, मराठी माणसाला मराठीवर प्रभुत्व मिळवणं जसं गरजेचं आहे तशीच कमीअधिक प्रमाणात इंग्रजी, हिंदी, इतर





अनुक्रमणिका

भारतीय आणि जागतिक भाषांची गरज आहे, भाषांतरकार्याची अवस्था सुधारायला पाहिजे, अशा अनेक गोष्टींकडे लोकांचे लक्ष वेधलं.

परिषदेचा कारभार पारदर्शी, काटकसरीचा पण दरिद्री मात्र नाही असा ठेवला. तो एकखांबी होऊ दिला नाही. योग्य वेळ येताच केळकरांनी अध्यक्षपद आणि संपादकपद यातून मोकळं होऊन इतर कार्यकर्त्यांना आपल्या क्षमतांची आणि जबाबदारीची जाणीव करून दिली. पत्रिकेचे स्वरूप अंतर्बाह्य नीटस राहील इकडे आम्ही लक्ष पुरवलं. पत्रिकेचे अंक वाचून झाल्यावर आम्ही ते जणू एका निरंतर पुस्तकाचेच भाग आहेत समजून साठवतो असं मला वाचक सांगू लागले. पत्रिकेचा आटोपसर आकार आणि सतत मागच्या अंकाचे येणारे संदर्भ याला पोषक ठरतात. माहितीबरोबर ज्ञान, जोडीला रोचक आणि रंजक मजकूर, शंका आणि समाधान, साद आणि प्रतिसाद, पानपूरकं इत्यादींच्या मार्फत सामान्य वाचकाचा सहभाग अशा तऱ्हेचं पत्रिकेचं स्वरूप राहिलं. कल्पक मुखपृष्ठं हा पत्रिकेचा अविभाज्य भाग राहिला. ग्रंथपाल मंडळींनी अंक बांधवून घेताना आवरण फाडून टाकण्याचा बावळटपणा करू नये. अगदी सुरुवातीच्याच काळात एका अर्थचतुर गृहस्थांनी विनाअट पन्नास हजाराची देणगी देऊन आणि महाराष्ट्र बँकेने वार्षिक पारितोषिकाचा पतकर घेऊन आम्ही आरंभलेला उद्योग नुसता आदर्शवादी नाही तर व्यवहारवादीही आहे याचीच जणू पावती मिळाली. आता तर कानावर आलं की पत्रिकेला कुणी तरुण व्यक्तीनं चक्क पीएच०डी०साठी शोधविषय बनवलं आहे. सर्वात आनंदाची गोष्ट म्हणजे हा उद्योग फारतर तीनचार वर्षं चालेल असा आमच्यातलीच काही मंडळी म्हणत असताना आज तर आपण तिचा रौप्यमहोत्सव साजरा करतो आहोत - सिल्व्हर जूबिली ही संकल्पना आपण इंग्रजीतून घेतली आहे याचं वैषम्य वाटू न देता!

आता 'वैखरी'बद्दल थोडंसं बोलायचं. ज्या कॉर्नेल विद्यापीठातून ज्ञानकोशकार केतकरांनी समाजशास्त्राची डॉक्टरेट मिळवली त्याच विद्यापीठातून भाषाशास्त्राची डॉक्टरेट घेऊन मी परतलो आणि आगरा विद्यापीठात शिकवू लागलो, चारपाच वर्षांनी डेक्कन कॉलेजमध्ये पुण्याला दाखल झालो १९६४मध्ये भारत इतिहास संशोधन मंडळाने वि०का० राजवाडे या तरुण तुर्काच्या एकशेएकाव्या जन्मदिनी भाषण द्यायला मला आमंत्रित केलं. मराठी व्याकरणावर मी बोललो, अध्यक्ष दत्तो वामन पोतदारांची पगडी कौतुकानं हलली, नंतर ते भाषण लेखरूपानं 'सत्यकथे'मध्ये छापून आलं. १९६९मध्ये माझे 'कवितेचे असतेपण' आणि 'भाषेचे नियमन' हे दोन लेख अनुक्रमे प्रभाकर पाध्ये आणि के० नारायण काळे या वयस्क तुर्कांच्या धाकाने माझ्या हातून लिहून झाले. भाषा आणि साहित्य या विषयांवरचे माझे बरेच लेख

प्रकाशित झाल्यावर त्यांचे दोन संग्रह काढणं आलंच. १९८३ मध्ये 'वैखरी' आणि 'रुजुवात' अशी माझी दोन पुस्तकं जाहीर झाली. पैकी 'रुजुवात' निघायला २००७ साल उजाडणार आहे. 'वैखरी'ची नवी आवृत्ती आता निघते आहे.

'वैखरी'च्या प्रकाशनानिमित्त केशवराव कोठावळे यांनी मला बोलावून घेतलं. 'वैखरी' नाव छान आहे पण सामान्य वाचकांच्या दृष्टीने 'भाषा आणि भाषाव्यवहार' असं काही उपशीर्षक त्याला जोडावं हे त्यांचं म्हणणं पटण्यासारखं होतं. 'वैखरी'ला एक सोडून चार पारितोषिकं मिळाली, बोलबाला झाल्यामुळे भाषा नि साहित्य क्षेत्राबाहेरचे वाचक मिळाले, तीनशे पानांच्या पुस्तकाला पन्नास रुपये ही त्या काळातही माफक ठरावी अशी किंमत ठेवली, तरी पंधराशे प्रतींची आवृत्ती संपवायला मराठी व्यक्तिगत वाचक, सार्वजनिक ग्रंथालयं, आणि शिक्षणसंस्था यांनी तब्बल सतरा वर्षं घेतली, अन तीसुद्धा बीए - एमए - मराठीसाठी संदर्भपुस्तक नेमल्यानंतर! पण कधी पावती मिळाली. अर्थशास्त्राचा विद्यार्थी असलेला एक सामाजिक कार्यकर्ता मला म्हणाला : भाषिक प्रश्नांबद्दल बरेच प्रश्न अन थोडीशी उत्तरं डोक्यात असल्यामुळे 'वैखरी' विकत घेऊन सपाट्यात वाचून काढलं, अन एक झाडू मारून सगळी कोळिष्टकं झटकून निघावं तशी स्थिती झाली!

थोडक्यात सांगायचं तर परिषद, पत्रिका, 'वैखरी' नि 'मध्यमा' पुस्तकांचं प्रकाशन हे उद्योग बऱ्यापैकी सफल झाले तरी हुरळून जावं अशी स्थिती नव्हती. मला धडा मिळाला तो हा की समाजपुरुषाची गती तरुण तुर्कांची नसते तर म्हाताऱ्या भारतीयांची असते! हे उद्योग चालू करणारे आणि त्यांना प्रतिसाद देणारे उगवत्या पिढीचे लोकच असतात. त्यांना आठवणी द्याव्या लागतात, त्यांच्या नजरेला सभोवतीची स्थिती आणावी लागते, नवे मनसुबे त्यांच्यापुढे ठेवावे लागतात. माझ्या भाषाविषयक आणि इतरही लेखनाला समवयस्कांचा प्रतिसाद असा होता : केळकर, तुम्ही अवघड लिहिता, अतिशय थोडक्यात लिहिता, तुमचं वाचताना आरामखुर्चीत रेलता येत नाही वगैरे. मी नाउमेद व्हायचो. पण माझ्या नंतरच्या पिढ्यांचे वाचक मिळाल्यावर अवस्था बदलली. एक नमुना : सर, तुम्ही पाल्हाळ लावत नाही की दळण लावत नाही. आमच्या पिढीला वेळ कमी असतो, अन मुख्य म्हणजे तुम्ही आमच्या बोलीत लिहिता, सरळ 'असं दिसतं' म्हणता, 'दृगोचर होतं' म्हणत नाही. नाहीतरी आजचं मनोगत मुख्यतः इथं जमलेल्या तरुण पिढीला उद्देशून आहे.

परिषदेचं काम आणि पत्रिकेचा प्रसार महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत आणि सामाजिक वर्गांत व्हावा म्हणून आम्हाला प्रतिनिधी मिळाले तर किती बरं होईल! स्थानिक चर्चागट अन कृतिगट यांच्या कार्यक्रमपत्रिकेत भाषिक प्रश्न आले तर? भाषांतराचा दर्जा सुधारावा किंवा वैचारिक लेखन अधिक चुस्त, अधिक पारदर्शी अन सुगम व्हावं यासाठी कृतिसत्रे झाली तर परिषदेकडून मार्गदर्शन मिळू शकेल. माझ्या

पिढीच्या दृष्टिकोणातून जशा या गोष्टी सुचतात तशा इतरही गोष्टी उगवत्या पिढीला, 'धडपडणाऱ्या मुलांना' सुचतील.

मी कोण्या एका काळी उगवत्या पिढीतलाच होतो की! चवथ्या इयत्तेत असताना आमचे रानडे मास्तर विशेषण ही संकल्पना 'घोडा काळा आहे', 'हा काळा घोडा आहे' अशा उदाहरणांतनं आम्हांला समजावून सांगत होते. हळूहळू फळ्यावर संकल्पना स्पष्ट करणारं विधान लिहिलं गेलं. नामाबद्दल विशेष माहिती सांगणारा शब्द म्हणजे विशेषण. केळकर नावाच्या मुलाचा शंकेखोर हात वर गेला. "काळा हा शब्द घोडा या नामाबद्दल थोडीच विशेष माहिती सांगतो आहे? घोडा या नामाने दाखवलेल्या वस्तूबद्दल माहिती सांगतो आहे." रानडे मास्तर थांबले, त्यांनी क्षणभर विचार केला आणि म्हणाले : केळकर, मग तूच सांग बरं विशेषण म्हणजे काय ते? केळकर उत्साहाने म्हणाला, "नामाने दाखवलेल्या वस्तूबद्दल विशेष माहिती सांगणारा शब्द म्हणजे विशेषण." ही नवी व्याख्या फळ्यावर लिहिली गेली आणि जुनी पुसली गेली. केळकरला रानडे मास्तरांबद्दल अधिकच आदर वाटू लागला. मग नंतर त्याने उन्हाळ्याच्या सुटीत एक मराठीचं नवं व्याकरण लिहायला घेतलं. दहाबारा पानं लिहिल्यावर त्याच्या लक्षात आलं की हे काम बरंच गुंतागुंतीचं आहे, सवडीनं करायला पाहिजे. सवडीनं व्याकरण लिहिलं गेलं, १९९७ साली एका धाडसी प्रकाशकानं ते बाहेर काढलं. केळकरच्या परप्रांतीय आणि विदेशी स्नेह्यांच्या आग्रहामुळे ते इंग्रजीत लिहिलं गेलं. पुस्तविक्रेता म्हणतो : परप्रांतीय आणि परदेशी ग्राहक ते हौसेनं घेतात, मराठी गिऱ्हाइकं बुजतात अन नको म्हणतात. प्रकाशक म्हणतो, पुस्तक इंग्रजीत होतं म्हणूनच मी धाडस केलं, मराठीत असतं तर माझ्यानं धाडस झालं नसतं. आजची पिढी ही आपली मराठी भाषा आहे तरी कशी या कुतूहलापोटी त्या पुस्तकाकडे वळेल का? बघू या काय होतं ते!

■

('वैखरी'च्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशन-समारंभानिमित्ताने डॉ॰ केळकर ह्यांनी व्यक्त केलेले मनोगत)

**शेवटची वर्षे**

अत्यंत बुद्धिमान व्यक्तीला दुसऱ्या माणसाचा निसर्गदत्त मठ्ठपणा समजायला फार जड जाते. तसे त्याचे अनेकदा व्हायचे. प्रत्येकजण अशोक केळकर असू शकत नाही. ही साधी गोष्ट कधीतरी तो विसरायचा. रागवायचा. त्याच्या शेवटच्या काही वर्षांत स्वत:च्या दिवसेंदिवस क्षीण होणाऱ्या मानसिक आणि शारीरिक शक्तींच्या नैसर्गिक ऱ्हासाला आपणच जबाबदार असल्यासारखा स्वत:वरच चिडायचा. लहान मुलाप्रमाणे वागायचा.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)



# स्वगत : २०१२

अशोक रा॰ केळकर

माझे विद्यार्थी म्हणजे – मी त्यांना मुलंच म्हणतो – माझा आणि त्यांचा अखंड संवाद चालू असतो. ते सुरुवातीला मला वचकून असतात, असायचे. पण नंतर त्यांच्या लक्षात येतं की हा प्राणी वाटतो तेवढा उपद्रवी नाही. हा आपल्या विषयात मग्न असल्यामुळे तो जरी सीरियस – गंभीर असला तरी सीरियस-सॉलम मात्र नाही. कारण त्याच्या मनामध्ये समोरच्याबद्दल नेहमीच आस्था असते. कधी त्याला हसू येतं, कधी रडूही येतं. आणि कधी हसावं की रडावं हेही त्याला कळेनासं होतं. माझ्या विधीवत, कायदेशीर विद्यार्थ्यांच्या खेरीज असे अनेक आहेत की, ज्यांनी स्वतःला माझा विद्यार्थी असं नेमूनच टाकलंय.

'सगळ्या विषयांमध्ये लक्ष घालणं' ही माझी वृत्ती कुठून आली, हे जर लक्षात घ्यायचं असेल तर माझी ओळख 'अशोक रा॰ केळकर' अशी करून द्यावी लागेल. रा म्हणजे रामचंद्र, माझे वडील. मी १९२९ साली पुण्यामध्ये एका मध्यमवर्गीय सुशिक्षित कुटुंबात जन्माला आलो. माझे वडील व्यासंगी प्राध्यापक होते. ते अतिशय खडतर परिस्थितीतून वर आले असले तरी आनंदी आणि स्वाभिमानी होते. अनेक विषयांमध्ये त्यांना रस होता. माझी आई थोडी कमी शिकलेली असली तरी तिच्या वडिलांनी मुद्दाम तिला शालेय शिक्षण घेण्यासाठी हिंगण्याला ठेवलं होतं, कर्व्यांच्या संस्थेत. त्यामुळे ती अडाणी नव्हती. आणि रूढिग्रस्तही नव्हती.

अशा घरामध्ये मी वाढलो. त्यामुळे अनेक गोष्टी झाल्या. मी अनेक विषयांत रस घेऊ लागलो. ह्यात पहिल्यांदा आपली वाट शोधायची, नाही सापडली तर स्वतःची वाट पाडायची हे वळण लागलं. माझा अपंगपणा हाही एक महत्त्वाचा भाग आहे. तेही सांगायला हवं. वयाच्या चौथ्या वर्षापर्यंत मला चालता येत नव्हतं. काही उपचारानंतर मला लंगडत का होईना, चालता यायला लागलं. ते लहानपणी असल्यामुळे मी ते सहज स्वीकारलं आणि त्यामुळेच कदाचित इतरांनी ते स्वीकारलं. चांगलं एक झालं, म्हणजे एकलकोंडा किंवा चिडखोर मात्र झालो नाही. पण ह्यामुळे नाही म्हटलं तरी, घरी बसल्यावर वाचन करायचं, चित्रं काढायची हे माझे उद्योग राहिले. एकानं म्हटलंय की मी विचार करतो म्हणून मी आहे. माझ्यापुरता विचार असा जर त्याचा अर्थ लावायचा असेल तर मी विचार करण्यासाठीच जगतो.





अनुक्रमणिका

मला त्या वेळेला अनेक वैचारिक सोबती मिळाले. रा॰प॰ नेने हे माझ्याहून काहीसे ज्येष्ठ. दुसरे दि॰के॰ बेडेकर. बेडेकरांबद्दल तर वेगळंच सांगायला हवं. बेडेकरांना मी त्यांच्या उत्तरपर्वात भेटलो. ते पार्टीतून वगैरे बाहेर पडले होते. संस्कृत हा माझा शाळेत विषय नव्हता. फ्रेंच होता. संस्कृत साहित्यशास्त्राबद्दलचं कुतूहल भागवण्यासाठी मी काही मराठी पुस्तके वाचली आणि थोडी निराशाच माझ्या पदरी आली. एवढ्यामध्ये बेडेकरांचे त्याच विषयावरील लेख माझ्या वाचनात आले आणि मी एकदम उत्तेजित झालो. माझ्या खाक्याप्रमाणे थेट एकदम बेडेकरांकडे जाऊन थडकलो आणि त्यांना माझ्या शंका विचारल्या. आमची चर्चा फार सुंदर झाली आणि ती चर्चा झाल्यानंतरही त्या माणसानं माझं नावही विचारलं नाही आणि चहाही विचारला नाही! पण नंतर आमची मैत्री झाली.

आता एक दुसरं बौद्धिक स्थित्यंतर होऊ घातलं होतं. डेक्कन कॉलेजचे डायरेक्टर डॉ॰ कत्रे यांनी भारतामध्ये भाषाविज्ञान विषय रुजवण्याच्या दृष्टीने रॉकफेलर फौंडेशनच्या मदतीने एक मोठा प्रकल्प हाती घेतला. त्या प्रकल्पामध्ये मी ओढला गेलो – पहिल्यांदा विद्यार्थी म्हणून आणि नंतर अध्यापक म्हणून. आणि पुढे तर त्या विषयात माझा मुक्कामच झाला.

माझ्या मनात हा विषय आधीपासून होता पण तो छंद ह्या स्वरूपात. माझा छंद हीच माझी पुढे रोजी-रोटी व्हायची होती हे मला तेव्हा कळलं. त्यामुळे मी अमेरिकेत गेलो, अमेरिकेत मी शिकलो. अमेरिकेतून परत आलो. माझं लग्न झालं. पत्नीबद्दल मी उल्लेख केलाच आहे. ती नुसतीच गृहिणी नव्हती. गृहिणी, सचिव, आणि सखी पण होती. मला दोन धाकट्या बहिणी होत्या, आणि वडील लवकर अंतरल्यामुळे त्यांची जबाबदारी माझ्यावर होती, ती पार पाडली. मला दोन मुलं झाली. ती मुलं आज व्यवस्थित, विवाहित आणि सुशिक्षित आहेत.

एवढ्यामध्ये एक दुसरा नैसर्गिक उत्पात झाला. तो म्हणजे पानशेतची धरणफुटी. तेव्हा सगळी माझी पुस्तकं आणि माझी टिपणं ह्यांची अक्षरशः धूळधाण झालेली दिसली. आणि जेव्हा ते कळलं की ही मानवनिर्मित आपत्ती होती आणि ती झाकण्याचा, कव्हरअप करण्याचा सरकार प्रयत्न करत होतं, तेव्हा मात्र मला अतिशय उद्वेग आला आणि कुठल्या समाजात आपण आहोत असं वाटून गेलं! मी कोण आहे हे समजायला ह्या सगळ्या गोष्टी आवश्यक आहेत.

■

'मी कोण आहे?' ह्या प्रश्नाचे एक उत्तर 'मी भाषाविद् आहे.' हा भाषाविद् किंवा लिंग्विस्ट, दोन अर्थांनी आहे. एक म्हणजे मला मराठी, हिंदी, इंग्रजी अन् फ्रेंच एवढ्या भाषा येतात आणि मी अनुवादही करू शकतो. मी असं त्रिभाषा-सूत्र

स्वीकारलं की आपण जे लिहायचं ते इंग्रजी, मराठी, हिंदी ह्यां तिन्ही भाषांतून लिहायचं. मी भाषाविद् आहे ह्याचा अर्थ भाषेबद्दल मला जिज्ञासा आहे, मी भाषेबद्दल बोलतो, आणि भाषाविज्ञान हा जो माझा विषय आहे त्याच्यामध्ये मी रमतो.

ह्या भाषाविज्ञान विषयामध्ये तीन कार्यं होतात. एक म्हणजे, भाषेचं विशिष्ट स्वरूप कसं आहे, भाषेमधला संदेश एका माणसाकडून दुसऱ्या माणसाकडे कोणकोणत्या पायऱ्यांनी पोहोचतो. पहिल्यांदा शब्द पोहोचतो, आणि नंतर शब्दरूपांच्या मार्फत अर्थरूपांकडे पोहोचतो, आणि अर्थरूपांच्या मार्फत अर्थाकडे पोहोचतो. म्हणजे भाषेचे तीन स्तर झाले, आणि ह्या तीनही स्तरांचं विश्लेषण करणं हे 'विश्लेषक भाषाविज्ञान' आहे. दुसरं उपक्षेत्र 'ऐतिहासिक भाषाविज्ञान'. म्हणजे काय, की दोन भाषांमध्ये निरनिराळे ऐतिहासिक संबंध असतात. उदाहरणार्थ, आपण म्हणतो की संस्कृत ही मराठीची आजी आहे आणि प्राकृत ही आई आहे. म्हणजे मग ह्या ज्या निरनिराळ्या बोली आहेत त्या मराठीच्या मुली आहेत की काय! वगैरे. हा एक संबंध झाला, ज्यातून भाषाकुलं ही कल्पना आली.

दुसरा एक जो संबंध आहे तो, एका भाषेची दुसऱ्या भाषेत काहीतरी ये जा चालू असते, उदाहरणार्थ मराठीतून इंग्रजीत शब्द येतात. इंग्रजीतून मराठीत शब्द येतात आणि अशी जी देवाण-घेवाण चालू असते, त्यांचा एक परिणाम होत असतो आणि तो भाषा-संपर्क इतिहासाला एक वळण देतो.

आणि तिसरं म्हणजे, एकाच क्षेत्रामध्ये अनेक भाषा वर्षानुवर्षे असल्या, उदाहरणार्थ भारतामध्ये निरनिराळ्या भाषा कुलांतल्या भाषा आहेत आणि त्यांचे एकमेकांवर परिणाम झालेले आहेत, त्यांचाही अभ्यास येतो. पण एवढ्याने भाषाविज्ञान पुरं होत नाही. दोन भाषांमध्ये काही अनपेक्षित साम्य किंवा भेद सापडतात. उदाहरणार्थ, मराठी आणि जपानी ह्या दोन्ही भाषांत एक साम्य आहे. त्या कर्ता, कर्म, क्रियापद ह्या क्रमानं चालतात. उलट, कश्मिरी आणि इंग्रजी ह्या दोन भाषांत एक साम्य आहे ते म्हणजे त्या मात्र कर्ता, क्रियापद आणि कर्म ह्या क्रमानं चालतात. पण अर्थात एक कबूल करायला पाहिजे की कुठलाही क्रम असो, ह्या सगळ्या भाषांमधून कर्ता, कर्म, क्रियापद ह्या तीन गोष्टी आढळतात. म्हणजे, एक जगभरचे साम्य आणि दुसरी विशिष्ट भाषांमधील साम्य. हे जे भेदाभेद आहेत, तोही एक भाषाविज्ञानाचा विषय आहे आणि ह्यातून भाषाविज्ञान उभं राहातं.

■

एका माणसानं दुसऱ्या माणसाला काही तरी कळवायचं, हा एक भाषेचा उद्योग असतो. त्याला आपण संज्ञापन असे म्हणू या. ह्या संज्ञापनामुळे एक माणूस दुसऱ्या माणसाला काही कळवू शकतो आणि भाषा हे ते कळवण्याचं साधन ठरतं. पण

एवढ्यावर गोष्टी थांबत नाहीत. माणूस जेव्हा दुसऱ्याला कळवतो तेव्हा त्याला ते स्वतःला कळावं लागतं आणि तेही भाषेमार्फतच काही अंशी कळतं. लहान मूल आहे, त्याला पाणी हा शब्द कसा कळतो? की ज्याला रंग नाही, जे कधी कधी आकाशातून पडतं, कधी त्याच्यात डुंबायला आपल्याला मिळतं, वगैरे वगैरे.

म्हणजे अर्थ असे शब्दांच्या भोवती जमा होत जातात आणि त्यांच्या मार्फत ते जग कळतं. संज्ञापनामुळे जर समाज कळत असला तर ह्या ज्ञापनामुळे जग कळतं आणि ते जग कळताना ह्या पायऱ्या लागतात. म्हणजे पहिल्यांदा शब्द कळतो, मग शेवटी अर्थ कळतो. आणि ह्यात जोडणारी शब्दरूपं आणि अर्थरूपं ही असतात. आणि हा एक भाषेचा एक भाग आहे. म्हणजे भाषाव्यवस्था आणि भाषाव्यवहार यांच्यामध्ये आपल्याला अंतर करावं लागतं.

आता तुम्ही म्हणाल की, आपण बोलणारा, ऐकणारा असं तुम्ही सारखं म्हणताय पण लिहितो त्याच काय? त्याचाही विचार अर्थात भाषेत करावा लागतो. पण तो करताना असं हळूहळू आपल्या लक्षात येतं की लेखन हे भाषेचं पुच्छ आहे. लहान मुलांच्या बाबतीत बघा किंवा मनुष्य जातीचा सबंध इतिहास बघा. आधी बोलणं येतं, मग उशिरा कधीतरी लेखन येतं आणि ते येतंच असं नाही. आपल्या देशात निरक्षर माणसं खूप आहेत. आणखी मनुष्यजातीच्या इतिहासात, निरक्षर युगंही खूप होऊन गेलीत. आणि तसं असल्यामुळे, लेखन हे पुच्छ असल्यामुळे, त्याचा संबध एकदम शब्दरूपाकडे पोचतोच अस नाही. तो कधी कधी थेट अर्थरूपांकडे पोहोचतो. त्यामुळे लेखन हे भाषेचं, शब्दांचं स्पर्धक होऊ शकत नाही. त्याला ते पुच्छच राहावं लागतं. आणि ते पुच्छ केवळ शब्दरूपांचं नव्हे तर एकंदर भाषेचंच ते पुच्छ असतं. आणि हे न लक्षात ठेवल्यामुळे काही घोटाळे होतात.

मघाशीच मी म्हटलं, की भाषाव्यवस्था आणि भाषाव्यवहार ह्या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. भाषाव्यवहार म्हणजे काय? ह्याची आपण थोडी ओळख करून घ्यायला पाहिजे. मघाशीच म्हटलं की भाषा ही संज्ञापन आणि ज्ञापन ह्यासाठी अतिशय उपयुक्त असते आणि ही उपयुक्तता हे भाषेचं मध्यवर्ती अंग आहे. पण एवढंच नाही. भाषेला इतरही दोन अंगं असतात. एक म्हणजे सामाजिकतेचं अंग. सामाजिकतेमध्ये जी निरनिराळी नाती असतात, उदाहरणार्थ, वरचा आणि खालचा, म्हणजे प्रतिष्ठेचा प्रश्न. किंवा जवळचा आणि दूरचा, म्हणजे निकटतेचा प्रश्न. ही जी सामाजिक नाती असतात, ती भाषेमुळे ठळक होत जातात. उदाहरणार्थ, तो जे बोलतो ते मला समजत नाही, म्हणजे दोन अर्थ होऊ शकतात : एक, तो खालचा असल्यामुळे मला समजत नाही किंवा तो दुसऱ्या भाषेतला असल्यामुळे समजत नाही. तर हा एक भाग झाला. पहिला उपयुक्ततेचा भाग, दुसरा सामाजिकतेचा भाग.

भाषेला तिसरंही एक – सांस्कृतिकतेचं अंग आहे आणि गंमत अशी की ते अंगही अगदी लहानपणी सुरू होतं. लहानपणी मुलांना जेव्हा भाषेची उपयुक्तता कळते आणि ती त्याच भाषेवर प्रभुत्व मिळवतात, तेव्हा त्या भाषेशी खेळण्याची त्यांची वृत्ती सुरू होते. ती मुलं बडबडगीत म्हणतात म्हणजे शब्दरूपांशी खेळतात. त्या शब्दांना पुष्कळदा धड अर्थही असतो, असं नाही. आणि एवढ्यानंही थांबत नाही, काही मुलं अर्थरूपांशी खेळायला लागतात. एकमेकाला कोडी घालतात किंवा त्यांना जे जोक्स वाटतात, ते ऐकण्याची शिक्षा कायम त्यांच्या आईला असते. हे जोक्सही पुष्कळदा भाषेशी खेळणारे असतात. काही मंडळी मोठी झाली तरी त्यांच्याजवळ ही जी भाषिक क्रीडा आहे ती कायम राहते. त्यांतून पुढे कवी, साहित्यिक होतात. जे अर्थ क्रीडेकडून पुढे जातात त्यांतून तत्त्वज्ञ, विचारवंत होऊ शकतात. आणि भाषेला हे असं एक अंग – सांस्कृतिक अंग प्राप्त होतं.

आता हे सगळं झाल्यानंतर तुम्ही म्हणाल की, ‘‘ही सगळी भाषेची अंगं कळली, भाषाविज्ञान कळलं. मग ह्याचा काही व्यावहारिक उपयोग आहे की नाही?’’ आहे ना! पण दुर्दैवानं हा व्यावहारिक उपयोग करून घेण्याची बुद्धी कुणालाही होत नाही. लोकांना वाटतं आपण बोलतो म्हणजे आपल्याला भाषाविज्ञान आपोआप कळतं. तसं नाही कळत. आणि त्यामुळे घोटाळे होतात. दुसरं म्हणजे, त्यांना एकच कुठलीतरी जडीबुटी सापडते आणि सगळ्या समस्यांना एकच एक उपाय असतो, अशा पद्धतीने ते विचार करतात. त्याच्यामुळे घोटाळे होतात. भाषेचे जे निरनिराळे प्रश्न आहेत ते एक एक सुटे घ्यायला पाहिजेत.

उदाहरणार्थ भाषेचे अध्यापन. हा एक महत्त्वाचा व्यावहारिक प्रश्न आहे की, भाषेचे अध्यापन कसं करायचं? तर, स्वभाषेचं अध्यापन आणि परभाषेचं अध्यापन ह्या वेगळ्या गोष्टी आहेत, हे लक्षात घेतलं जात नाही. ते घेण्यासाठी आपल्याला साक्षरता ही कल्पना स्पष्ट व्हायला पाहिजे. मघाशी मी लेखनाचा उल्लेख केला पण साक्षरता दोन तऱ्हेची असते. दृश्य-साक्षरता म्हणजे लेखन येणं. स्वभाषेत सुद्धा मुलांना शाळेत शिरायच्या आधीच थोडीबहुत मौखिक भाषा यायला लागलेली असते, पण त्यांना दृश्य-भाषेत साक्षर करावं लागतं. परभाषेत तर दोन्ही गोष्टी व्हायच्या असतात. आणि दृश्य-साक्षरता आणि श्रव्य-साक्षरताही निर्माण करायला लागते, त्याच्याकडेही दुर्लक्ष होतं. उदाहरणार्थ इंग्रजी शिकवताना इंग्रजीचे उच्चार नाही शिकवले जात, स्पेलिंग शिकवलं जातं. तसं व्हायला नको. ते सर्व करताना, मघाशी म्हटलं की, साक्षरता दोन तऱ्हेची असते. एक प्राथमिक साक्षरता, तिला आपण कौशल्य म्हणू. दुसरं, आणखीन वरच्या दर्जाची साक्षरता, तिला आपण नैपुण्य म्हणू. म्हणजे, उदाहरणार्थ, उच्चार नुसते करायचे नाहीत तर ते प्रभावी रीतीने कसे, आवाज





अनुक्रमणिका

वर-खाली करून करता येतील, ह्याचा विचार करायचा. किंवा शब्दाला शब्द नुसता न जोडता ते प्रभावी रीतीने कसे जोडता येतील, हे पाहायचं आणि ते शिकवायचे. तर परभाषा. स्वभाषेत मी म्हटलं की तुम्हाला ही साक्षरता शिकवावी लागते. परभाषा शिकवताना आणखीन काही गोष्टी करायला लागतात. पहिली गोष्ट म्हणजे ही रूपं हाताळण्याची सवय व्हावी लागते. ती आपोआप तोंडातून यायला पाहिजेत किंवा कानांतून आपोआप मेंदूत शिरायला पाहिजेत. आणि ह्यासाठी सराव लागतो. आणि हा सराव करण्यासाठी, आपल्या जुन्या पाठशाळेत संथा देत असत तसं, म्हणजे पाठांतर करायचं आणि ते स्मरणातून म्हणून दाखवायचं. ह्यामुळे उच्चार, रूपं, त्यांचे क्रम तोंडात बसतात.

दुसरा भाग म्हणजे, भाषा आणि बाहेरचं जग यांचा साक्षात संबंध जोडला जाणं. म्हणजे अमुक एक पक्षी तुमच्या डोळ्यांसमोर आला तर आपोआप तुमच्या मनात स्पॅरो (Sparrow) हा शब्द आला पाहिजे. पहिल्यांदा चिमणी शब्द येतो मग स्पॅरो (Sparrow) येतो ह्याला काही अर्थ नाही. त्याच्यासाठी मग चित्रांचा उपयोग होऊ शकतो, आणि ज्या काही वस्तू वर्गात असतात, त्यांचा उपयोग होऊ शकतो. काही वेळेला एखादी सिच्युएशन तशी आहे, तर मग नाट्यीकरण करायचं, की एक माणूस दुसऱ्या माणसाकडून काहीतरी विकत घेतोय, ते तुम्ही कसं कराल मुलांनो? असं पाहायचं.

जर भाषा ही केवळ साहित्यासाठी शिकवायची असेल – उदाहरणार्थ संस्कृत – तर ती थोड्या वेगळ्या पद्धतीने शिकवायला लागेल. सर्व परभाषा शिकवताना एकच एक पद्धत उपयोगी पडते ही समजूत चुकीची आहे आणि त्यासाठी वेगवेगळ्या कामांसाठी वेगवेगळ्या पद्धती कशा उपयोगी पडतात हे समजून घेतलं पाहिजे.

तिसरा एक प्रश्न नेहमी लोकांच्या डोळ्यांसमोर असतो की भाषेतून शिकवणं आणि भाषा शिकवणं ह्याच्यामध्ये लोक घोटाळा करतात. उदाहरणार्थ, मुलांचं इंग्रजी सुधारावं ह्यासाठी त्यांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालावं अशी एक कल्पना पुढे येते. तसं होतंच असं नाही हे मी बघितलेलं आहे. त्याचं कारण असं आहे की, माध्यम म्हणून शिकवताना भाषा अगोदर आली पाहिजे ही साधी गोष्ट लोक विसरतात. अगदी लहानपणी त्यांना इंग्रजी माध्यमातून शिकवणं, म्हणजे ज्या मुलाला धड अजून चालता येत नाही, त्याला एकदम सायकलवर बसून चालायला लाग, असं सांगण्यासारखं आहे, आणि हे अत्यंत अन्यायाचं आहे, असं मला वाटतं.

पुढे दुसराही एक भाग आहे की पुढच्या अवस्थेत – उच्च शिक्षणाच्या अवस्थेत – मातृभाषेचं महत्त्व कमी होतं. जी दुसरी भाषा आहे – इंग्रजी म्हणा, हिंदी म्हणा – ती जोपर्यंत तुम्हांला व्यवस्थित यायला लागली असेल तर काही अडचण पडत नाही.

त्या ठिकाणी कोणता विषय कोणत्या भाषेत उपलब्ध आहे ह्याचा विचार करावा लागतो. तुम्हांला जर आयुर्वेद शिकायचा असेल तर थोडं तरी संस्कृत यायला पाहिजे; जर तुम्हाला हिंदुस्थानी संगीत शिकायचं असेल तर थोडं तरी हिंदुस्थानी यायला पाहिजे, ह्या पद्धतीने. म्हणजे माध्यमाबद्दल सुद्धा अतिरेकी, एका टोकाचा विचार करणं बरोबर नाही. व्यावहारिक उपचार, उपाय करायला पाहिजेत.



तर मी आत्तापर्यंत माझी जी पहिली ओळख सगळीकडे आहे – भाषाविद् म्हणून – ती करून दिली. पण भाषाविद् होण्याच्या अगोदर मी साहित्यप्रेमी आणि कलाप्रेमी पण होतो, हे लोकांना विसरू द्यायचं नाहीये. साहित्याकडे मी दोन बाजूंनी येतो. एक लक्षात ठेवायला पाहिजे की मला इतर कलाही परिचित आहेत. त्यामुळे मला हे समजणं सोपं गेलं की साहित्य ही एक कला आहे आणि साहित्यकृती ही एक कलाकृती आहे. चित्रकलेला जशी वेगवेगळी अंगं असतात तशी साहित्यालाही असतात. उदाहरणार्थ, चित्रकलेला एक साधनद्रव्य असतं – रंगद्रव्य – आणखीन एक फलक. तसं साहित्यालाही साधनद्रव्य असतं, ते म्हणजे भाषा. त्यातले शब्दरूप, अर्थरूप हा सगळा भाषेच्या साधनद्रव्याचा भाग आहे. आपण पटकन म्हणतो की भाषा हे साहित्याचं साधनद्रव्य आहे. म्हणजे भाषेतले शब्दरूप, अर्थरूप वगैरे. तसं भाषेला एक आशयद्रव्यदेखील असतं. जसं चित्रकलेला आशयद्रव्य असतं; चित्रं निसर्गाबद्दल असतात, माणसाबद्दल असतात, मनातल्या भावांबद्दल असतात. ज्याला आपण अमूर्त चित्रकला म्हणतो, त्यालासुद्धा आशय असतोच. तो आशय अमूर्त, मनातला असतो पण आशय असतो.

भाषेलाही आशयद्रव्य असतं. उदाहरणार्थ, भाषेमध्ये समोरचं वास्तव, माणसं हाही एक भाग येत असतो, किंवा मनातला जो भाग असतो – मनातले भाव, मनातल्या प्रतिक्रिया – तोही भाषेचा, आशयद्रव्याचा भाग असू शकतो. मग माध्यमाचा प्रश्न कुठे उत्पन्न होतो? भाषा कलाकृती बनते, तेव्हा हे नुसते आशयद्रव्य आणि साधनद्रव्य असून भागत नाही. एखाद्या फलकावर तुम्ही भारताचा रंगीत नकाशा काढलात तर ते काही चित्र होत नाही. कारण तिथेही दोन्ही साधनद्रव्यं आणि आशयद्रव्यं असतात, पण त्यांचं माध्यम झालेलं नसतं. माध्यमामध्ये दोन्हीचा मिलाफ व्हावा लागतो, ती दोघं एकत्र यायला लागतात. आणि ती आली म्हणजे मग चित्राकडे पाहिलं तर मग आपल्याला भारताचा नकाशा दिसत नाही, किंवा ते पेंट्स असतात, तेही दिसत नाही, आपल्याला दिसतं काय? तर आपल्याला रंग दिसतो, आपल्याला आकार दिसतात, आपल्याला पोत दिसतो. आणि रंग, आकार, पोत हे चित्रकलेचं खऱ्या अर्थानं माध्यम दिसतं. भाषेलाही एक माध्यम असतं हं! ते

साधनद्रव्य आणि आशयद्रव्य हे सहित होतात, म्हणून तर त्याला आपण साहित्य म्हणतो. ते परस्परांत मिळून जातात आणि भाषेचं माध्यम, साहित्य तयार होतं. हे माध्यम निरनिराळ्या अंगांनी खुलू शकतं. उदाहरणार्थ, भाषा काव्यात्म असू शकते, साहित्य काव्यात्म असू शकतं आणि त्याच्यामध्ये एक काव्यात्म साहित्य वर्तमानाचा वेध घेतं आणि तो स्वसंवादातून घेतं. स्वसंवाद आणि वर्तमानाचा वेध ह्याच्यातून काव्यात्म साहित्य तयार होतं. भाषेचं नाट्यात्मही माध्यम असतं. त्याच्यामध्ये स्वसंवाद नसतो, अन्योन्य संवाद असतो, म्हणजे दोघांचा परस्परांशी संवाद. पण त्याच्यातला जो काळ असतो, तो भविष्यवेध असतो. आणि अन्योन्य संवादातून भविष्यवेध घेतं ते नाट्य, नाट्यात्म साहित्य. तिसरं जे आहे ते कथनात्म साहित्य. कथनात्म साहित्य हे अन्य-संवादी असतं. एकच माणूस इतरांना ऐकवत असतो. आणि तो भूतवेध घेत असतो. ह्याप्रमाणे, साहित्यात जी कला म्हणून आहे ती सिद्ध होते आणि त्यामुळे तीन प्रकारचे साहित्य उभं राहू शकतं – काव्यात्म, नाट्यात्म आणि कथनात्म.

म्हणजे आपण आतापर्यंत विचार केला, तो साहित्याचा कला म्हणून केला. पण साहित्य हा एक भाषाव्यापारही असतो; भाषाव्यवहारही असतो, हे आपण विसरता कामा नये. त्याच्यासाठी आपल्याला वाङ्मय ही दुसरी संकल्पना मांडावी लागते – साहित्यापासून वेगळी अशी. लोक सरसकट साहित्य आणि वाङ्मय एकच समजतात. वाङ्मय म्हणजे काय? एखाद्या समाजाच्या भाषाव्यवहारामध्ये काही एक मजकूर असा असतो की ज्याची वारंवार पारायणं होतात. पारायण म्हणजे एक मनुष्य बसून पोथी वाचतो, तशी नव्हे. एखादं पुस्तक आपण पुन्हा पुन्हा वाचतो किंवा अनेक माणसं एकावेळी पुस्तक वाचत असतात. पुस्तकच असं नाही, कविता आहे. राष्ट्रगीताची तर पारायणंच पारायणं. कुठल्याही कारणामुळे त्या मजकुराची वारंवार पारायणं जर समाजात होत असली आणि एवढंच नव्हे, तर तो पारायणं करण्याच्या योग्यतेचा मजकूर आहे असं जर वाटत असलं, उदाहरणार्थ पाढ्यांची पारायणं होतात पण पाढे हे साहित्य ठरत नाही. ह्याचं कारण तो पारायणयोग्य मजकूर आहे अशी त्याला प्रतिष्ठा नसते. ही जर प्रतिष्ठा असली तर ते वाङ्मय होतं. आणि हे वाङ्मय जर, शिवाय कला असेल, ललितकला असेल तर ते ललितच वाङ्मय होतं आणि ललित वाङ्मय आणि साहित्य हे दोन शब्द एकाच अर्थांनी वापरता येतात. पण ह्याचा अर्थ असा की ललित नसलेलं वाङ्मय पण असतं.

बरंचसं वैचारिक वाङ्मय हे साहित्य नसतं. उदाहरणार्थ, मे०पुं० रेग्यांचे लेख किती जरी वाचनीय असले तरी त्यांना आपल्याला कलाकृती म्हणता येत नाही. ते वैचारिक वाङ्मय आहे. आणि वैचारिक वाङ्मय म्हणूनच त्याला प्रतिष्ठा आहे. धार्मिक

वाङ्मयाची गोष्ट थोडी निराळी आहे. त्याच्यामध्ये थोडासा मेळ असू शकतो. उदाहरणार्थ ऋग्वेदातलं उषःसूक्त घ्या, किंवा बायबलमधलं सॉलोमनचं गीत घ्या, किंवा अथर्ववेदातलं पृथ्वी-सूक्त, ही उत्तम काव्याची उदाहरणं आहेत. पण त्याच, नव्या बायबलमध्ये नुसत्या वंशावळ्या दिलेल्या असतात. किंवा अथर्ववेदामध्ये जादूटोण्याचे मंत्र दिलेले असतात, त्यांना आपल्याला साहित्य म्हणता येत नाही. तर धार्मिक वाङ्मयाची प्रकृती अशी संमिश्र असते. त्या दृष्टीनं पाहिलं तर आपल्याला साहित्याचा ह्या दोन्ही बाजूंनी विचार करता येतो, हे लक्षात येईल.

साहित्याबद्दल बोलायचं म्हणजे तुम्हाला आधी साहित्य भिडलेलं असायला पाहिजे, आणि त्याचा आस्वाद तुम्ही घ्यायला पाहिजे. आस्वादातून प्रचीती येते आणि प्रचीतीतून काहीतरी निर्णय येतो. ह्या क्रियेतून तुम्ही जायला पाहिजे. तर तुम्ही जो काही निर्णय घ्याल, त्याला वजन येतं.

आणि लोक काय म्हणतात समीक्षा करताना, की एक काहीतरी आपण समीक्षक सिद्धांत बांधू की, साहित्याने अमुक केले पाहिजे, साहित्याने तमुक केले पाहिजे. ते ह्याच्यात होतंय की नाही, 'होतंय.. नाही होतंय'. अस करून लोक निर्णय देत असतात. आणि ती आस्वाद घेणारी समीक्षा, त्याच्याकडे थोडं तुच्छतेनं बघितलं जातं. ते काही खरं नाही. कुठल्याही खऱ्या, ऑथेंटिक, असली समीक्षेची सुरुवात आस्वादातूनच होते. आस्वादातून ती पुढे जायला पाहिजे, हे कबूल. पुढे जाते म्हणजे काय होतं की, तो जो रसिक असतो तो नुसता भोक्ता नाही रहात, तो साक्षी होतो. आणि तो साक्षी-भोक्ता झाला की मग त्या आस्वादाला, त्या निर्णयाला एक मोल येत आणि तो समीक्षक होतो.

दुसरा एक भाग आहे की आपण इतका वेळ साहित्यकर्त्याकडे लक्ष दिलं नाही, पण तेही द्यायला पाहिजे. आणि तो साहित्यकर्ता हाही एका दृष्टीनं साक्षी-भोक्ता असतो. फक्त त्याचं जे भोक्तृत्व असतं ते साधनद्रव्यांचं असतं. तो भाषेमध्ये खेळत असतो, तो आशयद्रव्यांमध्ये खेळत असतो आणि एकदम त्याला काहीतरी स्फूर्ती येते, ठिणगी पडते, आपण म्हणतो. म्हणजे काय होतं? तो त्या सबंध साक्षी भोक्तृत्वातून एक काहीतरी निर्मितीची क्रिया सुरू होते, आणि ते मघाशी जसं भाषेचं म्हटलं, त्याच पद्धतीनं आपण त्याला म्हणू की ठिणगी पडते. म्हणजे पश्यन्ती आणि नंतर कधी कधी पश्. ठिणगीबरोबर एखादी प्रतिमा एकटीच न येता एखादी ओळही येऊ शकते, एखादं दृश्यही येऊ शकतं.

हे झाल्यानंतर पुढची अवस्था येते, ती म्हणजे मध्यमा म्हणू आपण. त्याच्यामध्ये ह्या ठिणगीचं रूपांतर होऊन निराळ्या शलाका तयार होतात. त्यांची एक मांडणी तयार होते आणि त्या कलाकृतीची मांडणी तयार झाली की मग तिसरी

अवस्था आहे ती वैखरी. आणि पूर्ण, सांग, सांगोपांग कलाकृती उभी राहाते. ह्या मार्गातून साहित्य निर्मिलं जातं. आता समीक्षेचं आणि ह्या निर्मितीचं, काही देणंघेणं आहे का? आहे आणि नाही. नाहीसुद्धा म्हणता येईल, कारण तो म्हणेल की माझ्यापुढे ही साहित्यकृती आहे, तिचा मी आस्वाद घेतोय, ती कशी निर्मित झाली, मला काय माहिती? आणि काही वेळेला खरोखरच माहिती नसतं. आता अजंठ्याच्या कृती पाहाणारे जे पर्यटक असतात, ते मानबिन डोलावतात, पण त्यांचं देणंघेणं असतं ते समोरच्या कृतीशी असतं.

याच्यामधून काही अडचणी उत्पन्न होतात. पहिली गोष्ट अशी की साक्षी-भोक्ता, समीक्षक हे ठीक आहे, निर्णय घेतो हेही ठीक आहे, पण इथे गोष्ट थांबत नाही. अतिविशिष्ट साहित्यकृती, 'युनिक' आणि ती अतिविशिष्ट रसिक पाहतोय आणि त्याच्या मधून अतिविशिष्ट निर्णय, इथेच सगळ थांबलं की हो. असं थांबायला तर नको, आणि ते नाहीच थांबत. कारण असं, तुम्ही एका कृतीबद्दल जेव्हा साक्षित्वातून विचार करता तेव्हा दुसऱ्या कृती तुमच्या डोळ्यांसमोर येतात. आणि असं म्हणू या की कवितेला दुसऱ्या कवितांची साथसंगत लागते, कथेला दुसऱ्या कथांची साथसंगत लागते. त्या आठवायला लागतात, वगैरे वगैरे. त्याप्रमाणे एका विशिष्ट कृतीकडून आपण अनेक कृतींकडे, साहित्यकृतींकडे जातो.

बरं तो रसिक, तो अतिविशिष्ट रसिक, स्वस्थ बसतो होय? तो उठून दुसऱ्या रसिकाकडे जातो. मला हे असं वाटतंय, तुला काय वाटतं? आणि तसं वाटल्याखेरीज त्याला राहावतच नाही. हा काही त्याचा केवळ बडबडेपणा नव्हे, तीही एक गरज आहे. कारण रसिक हा एका गटातून आलेला असतो, म्हणून तर हे होतं. ह्याच्यातून एक धर्मसंकट उभं राहातं; ते असं की, ह्या विशिष्ट साहित्यकृतीतून अनेक साहित्यकृतींकडे कसं जायचं, ह्या विशिष्ट रसिकाकडून अनेक रसिकांकडे कसं जायचं? ह्या धर्मसंकटातून सुटका आहे का? त्याचं उत्तर – नाही, आहे आणि नाही. आहे हे कसं? ही सुटका करायला मघाशी मी दुसरा मार्ग सांगितला की साहित्य हा एक भाषाव्यापार आहे. तिकडेपण आपल्याला वळायला पाहिजे. ह्या ज्या आपल्यापुढे एकापेक्षा अधिक साहित्यकृती आहेत त्यांच्या आशयद्रव्याची भाषा, आशयद्रव्याची, साधनद्रव्याची आपण उठाठेव करायला लागतो की आपल्याला त्या जोडण्याचा मार्ग खुला होतो.

तीच गोष्ट रसिकांची आहे की, हा रसिक, तो रसिक. हे रसिक कुठून आले, त्यांची रुची कशी घडली? त्या रुचीची अभिरुची कशी होते? ते करताना तिकडून मार्ग सापडत जातो. आणि ते धर्मसंकट थोडंसं दूर होतं, पण पूर्णपणे दूर होत नाही. शेवटी मतभेद राहतातच आणि साहित्य-समीक्षा ही जात्या अतिशय वादग्रस्त गोष्ट आहे. ती

तुमच्या मनावर ठसते. आणि त्याच्यातून साहित्यातले वाद निर्माण होतात. त्याच्याबद्दल फक्त मागणं एवढंच की ते वादच राहावेत, त्यांचा वितंडवाद होऊ नये.

मघाशी भाषेबद्दल बोलताना, मी भाषेच्या सिद्धांतापासून भाषेच्या व्यवहाराकडे आलो. आताही तसंच यायला काही हरकत नाही, नाही का? साहित्याचा एक व्यवहार असतो उदाहरणार्थ साहित्य वर्गात शिकवावं लागतं. ते कसं शिकवायचं, ह्याचे प्रश्न असतात.

दुसरा एक भाग असतो की समाजात साहित्याच्या पातळ्या असतात. एक लोकसाहित्य असतं, दुसरं बहुजनप्रिय साहित्य असतं आणि तिसरं अभिजनप्रिय साहित्य असतं. ह्या पातळ्यांचं काय करायचं? तर काही लोक सोयीस्कर म्हणजे, त्यातून एकच पकडतात आणि दुसरं सरळ सोडून देतात. उदाहरणार्थ ते म्हणतात, " अभिजनप्रिय साहित्य म्हणजेच खरं साहित्य, बाकीचा हा कचरा".

हे काही खरं नाही. कारण, साहित्याची जी व्याख्या सांगितली मघाशी ती त्यालाही लागू आहे. आणि मघाशी जे म्हटलं की धर्मसंकट, ते धर्मसंकट इथे डोकावतं हे आपल्याला लक्षात घ्यायला पाहिजे. तर लोकसाहित्याचा, लोकप्रिय साहित्याचा आणि अभिजनप्रिय साहित्याचा समीक्षेच्या दृष्टीने अभ्यास व्हायला पाहिजे. केवळ लोकसाहित्य गोळा करणं काही पुरेसं नाही. ते व्हायला पाहिजे. जसं साहित्याचं प्रस्तुतीकरण मौखिक पद्धतीनं होतं, लेखी पद्धतीनं होतं, मुद्रण होतं त्याचं. वगैरे वगैरे. ते योग्य, आणि हल्ली ते प्रसारमाध्यमातून होतं, ते बरोबर होतंय की नाही, त्याच्याबद्दल संबंधितांना प्रशिक्षण मिळतंय की नाही, ह्याचाही विचार करायला पाहिजे.

आता तुम्हाला एक आठवण होईल की, अहो, साहित्य-व्यवहाराचा आणखीन एक मुद्दा आहे त्याचं काय? साहित्य-संमेलन. आणि ह्या साहित्य-संमेलनाचं, मराठी साहित्य-संमेलनाचं बरंच कौतुकही झालेलं आहे. कारण जगातल्या फार थोड्या भाषांमधून असं संमेलन होतं. आणि त्यामुळे त्याचं जसं कौतुक झालं, तसं त्याच्याबद्दल वादही झालेले आहेत.

तर मघाशी जे म्हटलं लोकप्रिय साहित्य, बहुजनप्रिय साहित्य, त्याचाही त्याच्याशी अंशतः संबंध आहे पण तेवढाच नाही. त्याच्यामध्ये इतर काही वैचारिक घोटाळा पण आहे. कन्नडी लोकांचं एक नाडहब्बू म्हणून एक संमेलन होतं. त्याच्यामध्ये ते सरळ सरळ कर्नाटक, कर्नाटकची संस्कृती, ह्याचाही विचार करतात आणि त्याचंच एक सेलिब्रेशन त्याच्यामध्ये होतं. साहित्य त्याच्यात येतं. आणि मला परवा ग्रंथदिंडीचं चित्र पाहताना असं वाटलं की हा एक प्रकारचा मराठी लोकांचा नाडहब्बू तर नाहीये ना? आणि नाडहब्बू असला तर तो नाडहब्बू म्हणून

स्वीकारण्यामध्ये काय हरकत आहे? तो त्याचा नाडहब्बूपणा आणि साहित्य-संमेलनपणा ह्या दोन्हींची काही सांगड घालता येईल का? का त्या दोन वेगळ्या गोष्टी करायला पाहिजेत? ह्या दृष्टींनी साहित्य-संमेलनाबद्दल विचार होऊ शकतो.



माझी मीच मुलाखत इतका वेळ घेत होतो, ती तर आता संपली. आता मंडळी तुमच्याशी बोलायला काही हरकत नाही. आता तुम्ही म्हणाल, 'आहे मनोहर तरी गमते उदास' असं तुम्ही का म्हणता बरं? कुणाला शंका येईल की ही उदासी मला वेळेवर मानसन्मान मिळाले नाहीत म्हणून आहे. मला २००२ साली पद्मश्री मिळाली, तीसुद्धा ७३व्या वर्षी!

माझी एक मैत्रीण म्हणाली की, अशोक, तू चाळीस वर्षे पुढे विचार करत असतोस. ५-१० वर्षं पुढे असणं हे ठीक आहे. ४० वर्षं म्हणजे फारच झालं. त्यामुळे लोकांची दमछाक होते. आणि माझी खात्री आहे की आता तुला पद्मश्री मिळालीय, तर तू आणखीन ४० वर्षं पुढे गेलेला असशील!". म्हणालो, "हो गेलोय". गोष्ट खरी आहे, कारण, चिन्हमीमांसा हा जो एक अतिशय व्यापक विचारव्यूह आहे, त्यानं मला सदैव मदत केलेली आहे. त्याच्यात मी शिरलेलो आहे. पण हा विषय मला समाजापर्यंत अजून पोहोचवता आलेला नाही. आता जेमतेम मंडळी भाषाविज्ञानापर्यंत पोहोचतायत. पण भाषाविज्ञानाच्या बाबतीतसुद्धा मराठी मंडळींनी भाषाविज्ञानाकडे पूर्ण पाठच फिरवली आहे, असं जवळ जवळ म्हणावं लागेल. डेक्कन कॉलेजमध्ये ह्या ज्ञानगंगेचा प्रवाह गेली तीसेक वर्षं वाहत आहे. पण माझ्या हाताखालून गेलेले मराठी विद्यार्थी एका हाताच्या बोटावरच मोजता येतात इतके कमी आहेत. इतर देशी-विदेशी विद्यार्थी लांब लांबहून इथे येत, पण मराठी माणसं कधी आलीच नाहीत. मध्यंतरी एक मी इंग्रजीत मराठीचं व्याकरण लिहिलं. ह्या परभाषक लोकांसाठी. ते इथं विकायला ठेवलं. तर तो विक्रेता मला सांगतो काय की, "तुमच्या व्याकरणाच्या पुस्तकाचा शोध घेत इथं विदेशी माणसं येतात, ते हौसेनं घेऊन जातात. पण एखादा मराठी माणूस आला आणि त्याला म्हटलं, अहो, हे बघा हे केळकरांचं पुस्तक. तर तो हातात झुरळ पडल्यासारखं ते टाकून देतो आणि पळून जातो. हा काय प्रकार आहे?" हा काय प्रकार आहे, ह्याचा विचार करण्यासारखा भाग हा आहे की, ही माणसं नुसती भाषाविज्ञानाकडे पाठ फिरवत नाहीत. एकंदर ज्ञानाकडेच त्यांनी पाठ फिरवली आहे. आता माझे तरुण मित्र राजेंद्र वोरा, हे कधी कधी महाराष्ट्रातल्या वैचारिक गारठ्याबद्दल बोलतात. दुसरे तरुण मित्र विनय हर्डीकर, हे कधी कधी 'सुमारांची सद्दी' असा शब्दप्रयोग करतात. हे शब्दप्रयोग काय दर्शवतात? उदासीचं ते एक महत्त्वाचं कारण आहे.

माझ्या उदासीचं दुसरं एक कारण म्हणजे चिन्हमीमांसा ह्या महत्त्वाच्या विषयाचा परिचय मी समाजाला पाहिजे तेवढा करून देऊ शकलो नाही. मी त्याच्यावर दोनदा व्याख्यानं दिली. देशी-विदेशी विद्यार्थ्यांनी त्याचा फायदा घेतला. पण मला अजून काही लोकांपर्यंत तो विषय पोहोचवता आलेला नाही. उदासीचं आणखी एक कारण म्हणजे, मघाशी म्हटल्याप्रमाणे, विद्यार्थिदशेपासून मुलांमध्ये पोसली जात असलेली ज्ञानविमुखता. तिच्याबद्दल काही करता येईल का ह्याचा मी विचार करतो आहे.

थोडक्यामध्ये, माझ्या उदासीचा संदर्भ हा केवळ व्यक्तिगत नाहीये, तो सबंध समाजाशी संबंधित आहे. आणि आजच्या भारतीय समाजाबद्दल काय बोलावं! पहिली गोष्ट अशी की, आजच्या भारतीय समाजाची – त्यातल्या त्यात महाराष्ट्रीय समाजाची – जी पडझड झालेली आहे, ती काही नवीन नाही. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर साठ वर्षे होऊन गेली. ह्या साठ वर्षांच्या काळात पडझड अधिकच जोरात झालेली आहे. पण आधीची जी साठ वर्षं आहेत, त्यांच्यातच ह्या पडझडीला सुरुवात झाली होती.

ही पडझड थांबवायची असेल तर, उदाहरणार्थ शिक्षक आणि संशोधक ह्या लोकांना समाजाने मान द्यायला पाहिजे. त्यांचा पदोपदी अवमान होतो. आमचा वर्ग १०० टक्क्यांनी पास झाला म्हणून शाळेने एक छोटासा समारंभ केला. आमचे गणिताचे आवडते शिक्षक रा॰ग॰ गोखले, हे त्या वेळेला उभं राहून म्हणाले, “मुलांनो, मी तुम्हाला एक गोष्ट सांगतो. तुम्ही मंडईत हमाली केलीत तरी हरकत नाही, पण शिक्षक होऊ नका!”. त्यांच्या बोलण्यामागे केवढी वेदना आणि उद्वेग असेल, ह्याची तुम्ही कल्पना करा. आणि ही स्थिती अजूनही चालू आहे.

आता तुम्ही म्हणाल की, असं कसं म्हणता? मनोहर आहेत ना, मनोहर गोष्टी आहेत. किंबहुना, ४६-४७च्या काळात, मी शाळेतून कॉलेजमध्ये आलो, तो स्वातंत्र्याचा, पहाटेचा आणि स्वातंत्र्यसूर्य उगवण्याचा काळ होता. आम्ही मंडळी अतिशय उत्साहात होतो. काय करून दाखवू नि काय नाही; काय शक्य आहे ह्याचा विचार करत होतो. परंतु ह्या उत्साहावर विरजण घालणाऱ्या बऱ्याच गोष्टी झाल्या. फाळणीचा उत्पात, गांधीजींचा खून, त्याच्यानंतर थोड्या वर्षांनी, संयुक्त महाराष्ट्राचा लढा... उत्पातच म्हणायला पाहिजे की! कारण शेवटी श्रीरामलूंचं निधन काय, किंवा मुंबईच्या हुतात्म्यांचं बलिदान काय? आमचे स्वदेशी राज्यकर्ते किती हेकट आणि मूर्ख असू शकतात, ह्याचंच ते उदाहरण होतं. पानशेतच्या उत्पाताचा मी मघाशीच उल्लेख केला. तरीपण आमचा उत्साह खच्ची झाला नाही. कारण काही चांगल्या गोष्टी होत होत्या. उदाहरणार्थ, हरितक्रांती झाली, श्वेतक्रांती झाली, शिक्षणाचा विस्तार वाढला. कुठे कुठे तुरळक महाविद्यालये होती, ती जिकडे तिकडे महाविद्यालये झाली.

पण शिक्षणाची गुणवत्ता? अर्थात विस्तार करताना गुणवत्ता तेवढी वाढणार नाही, ही आमच्या मनाची तयारी होती. पण गुणवत्ता न वाढणं वेगळं, आणि आहे ती गुणवत्ता झपाट्यानं खाली घसरणं वेगळं! मी माझ्या वडिलांपासून एक धडा शिकलो होतो. ते ज्या संस्थेत होते, त्या संस्थेच्या राजकारणामुळे, त्या संस्थेचं नुकसान होतंय हे त्यांनी पाहिलं की, ते पोटतिडकीनं त्याच्यात भाग घेत. त्यांनी त्याच्यासाठी खूप कष्ट घेतले. अंतिम विनाश टळला पण मुख्य ती जी घसरण होती ती झालीच. तर मी ठरवलं की आपण ह्या कॉलेजच्या राजकारणात भाग घ्यायचा नाही कारण आपण काही घसरण टाळू शकणार नाही. आज डेक्कन कॉलेजची स्थिती जी आहे ती खूप उत्साह वाटावा अशी नाहीये. तरीही अशा परिस्थितीमध्ये, ज्या चांगल्या घटना आहेत, त्यांचा विचार तर जरूर व्हायला पाहिजे.

आपण माहितीची क्रांती केली, मघाशी म्हटल्याप्रमाणे हरितक्रांती केली. कितीतरी चांगल्या चांगल्या गोष्टी इथे होतायत. पण ह्याच्या पाठीमागे, खाली, समाजाला कीड लागलेली आहे आणि त्यामुळे समाज ह्या चांगल्या गोष्टींचा पूर्ण फायदा घेऊ शकेल की नाही, ह्याची मला दाट शंका आहे. 'आहे मनोहर परि गमते उदास' ह्या माझ्या भावनेतून माझी सुटका होणं कठीण आहे.

■

[अतुल पेठे प्रॉडक्शन्स, पुणे निर्मित 'ऐवज' ह्या प्रकल्पातील 'डॉ॰ अशोक केळकर : व्यक्ती आणि विचार' – आत्मपट ह्या डीव्हीडीतील कथनाचा संपादित अंश. साभार. संकल्पना, छायाचित्रण व दिग्दर्शन : अतुल पेठे. (चलभाष: 94223 19717. ई-पत्ता: atul.pethe@hotmail.com). ही डीव्हीडी ₹१००/- एवढ्या अल्प किमतीत उपलब्ध आहे. डॉ॰ केळकरांच्या मौखिक प्रतिपादनाचे प्रतिलेखन : सायली दिवाकर]

**कोलटकरच्या कविता**

अरुणच्या (कोलटकर) कवितांचे महत्त्व ओळखणाऱ्या आणि अरुणच्या मृत्यूनंतरही त्याच्या वाङ्मयाची जबाबदारी संभाळणाऱ्या अशोक शहाणेनं मला अशोक केळकर गेल्यानंतर एक गोष्ट सांगितली ती म्हणजे अरुणच्या पहिल्या संग्रहात असलेल्या अनेक कविता अरुणने अशोक केळकरला अंतर्देशीय पत्रातून पाठवल्या होत्या. त्या अशोक केळकरने विसांहून अधिक वर्षे जपून ठेवल्या होत्या. त्या आज हयात आहेत ह्याला कारण केवळ अशोक केळकर.

- अरुण खोपकर (आपले वाङ्मयवृत्त, ऑक्टोबर २०१४)

## लेखक-परिचय

- **काळे**, कल्याण : एम॰ए॰, पीएच॰डी॰ (मराठी). बार्शी, नंदुरबार, पुणे येथे अध्यापन. पुणे विद्यापीठातून प्राध्यापक व विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. २० पुस्तके, १५०पेक्षा अधिक लेख. भाषाविज्ञान, संतवाङ्मय हे विशेष अभ्यासाचे विषय. 'भाषा आणि जीवन'चे सुमारे आठ वर्षे प्रमुख संपादक.
  टपाल-पत्ता: अ-5 प्रज्ञानगड, 19-3-3, नवश्या मारुती गल्ली, वीटभट्टीमागे, सिंहगड रस्ता, पुणे 411 030
  स्थिरभाष: (020)2425 3136

- **कुलकर्णी**, द॰भि॰ : पीएच॰डी॰(मराठी), रशियन भाषेतील पदविका, नागपूर विद्यापीठातून मराठीचे प्रोफेसर व विभागप्रमुख म्हणून निवृत्त. एकतीस प्रकाशित ग्रंथ. पीएच॰डी॰ पदवीसाठी २५ विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. अनेक पारितोषिके व सन्मानांचे मानकरी. मान्यवर शिक्षक. अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलनाचे माजी अध्यक्ष.
  टपाल-पत्ता: 'अंभृणी', वसुधा 004, डीएसके विश्व, धायरी, पुणे 411 041.
  स्थिरभाष : (020)2438 0894

- **कुलकर्णी-जोशी**, सोनल : डेक्कन कॉलेजमधून भाषाविज्ञानात एम॰ए॰ भाषाविज्ञानातच रेडिंग युनिव्हर्सिटीची (लंडन) पीएच॰डी॰ प्राप्त. सध्या डेक्कन कॉलेज, पुणे येथे भाषाविज्ञान विभागात प्रोफेसर म्हणून कार्यरत. भाषासंपर्क विषयात संशोधन, तसेच कन्नड भाषेच्या अनुषंगाने मराठीच्या बोलीभाषांवर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास चालू. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या सहयोगाने हाती घेण्यात आलेला, नंदुरबार खोऱ्यातील भिल्ल व पावरा जमातींच्या विस्थापन व पुनर्वसनाचा समाजिक भाषाविज्ञानाच्या अंगाने करावयाच्या अभ्यासाचा महत्त्वाचा संशोधन प्रकल्प अलीकडेच पूर्ण.
  टपाल-पत्ता: 6 पूर्वा अपार्टमेंट्स, 'बी' बिल्डिंग, 30-31 चिंतामणीनगर, सहकारनगर-2, पुणे 411 009.
  स्थिरभाष: 020 2422 5577;
  चलभाष: 098904 44606
  ई-पत्ता: sonal.kulkarni@dcpune.ac.in

- **घारे**, दीपक : कलासमीक्षक म्हणून विख्यात. 'आपुलेनि अवकाशे', 'लिओनार्दो - बहुरूपी प्रतिभावंत', 'विचारक्षितिजे', 'चिं॰त्र्यं॰ खानोलकर' वगैरे स्वतंत्र समीक्षा व चरित्रपर ग्रंथ, 'मराठीतील साहित्यलेणी', 'ह॰मो॰ मराठे यांच्या निवडक कथा' (संपादन), 'दृश्यकला चरित्रकोश' (सह-संपादन) इत्यादी ग्रंथसंपदा.
  टपाल-पत्ता: 4 शिवांजली, पाथर्लीरोड, गोग्रासवाडी, डोंबिवली (पूर्व) 421 201
  चलभाष : 091677 64438;
  ई-पत्ता: gharedeepak@rediffmail.com

- **देव**, विजया : भाषाविज्ञानात एम॰ए॰ व पीएच॰डी॰, मराठीमध्येही एम॰ए॰, पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात काही काळ अधिव्याख्याता. पाच अनुवादित व एक स्वतंत्र अशी सहा पुस्तके प्रसिद्ध. दोन पुस्तकांना प्रस्तावना. नियतकालिकांत ललित व अनुवादित साहित्य व साहित्यसमीक्षापर लेखन. मराठीचे परभाषा अध्यापन. सध्या पुणे विद्यापीठात अभ्यागत प्राध्यापक. भाषाविज्ञान व तौलनिक साहित्य, भाषाकौशल्ये ह्या विषयांचे अध्यापन.
  टपाल-पत्ता: 'सुप्रिया', 61/14 एरंडवणे, प्रभात रोड, चौदावी गल्ली, इन्कम टॅक्स ऑफिसजवळ, पुणे 411 004.
  स्थिरभाष: (020)2546 8693;
  चलभाष : 094230 09522;
  ई-पत्ता: vijayadeo@yahoo.com

- **धोंगडे**, रमेश : एम॰ए॰(इंग्लिश), एम॰ए॰ व पीएच॰डी॰ (भाषाविज्ञान), 'मूड्स अँड आस्पेक्ट्स इन इंग्लिश अँड मराठी' या विषयावर पीएच॰डी॰ प्रबंध. भाषाविज्ञानाचे निवृत्त प्रोफेसर (डेक्कन कॉलेज). ऑक्सफर्ड इंग्लिश-मराठी शब्दकोश, अर्वाचीन मराठी, 'भाषा आणि भाषाविज्ञान', 'मराठी भाषा आणि शैली', 'सामाजिक भाषाविज्ञान', 'शैलीवैज्ञानिक समीक्षा', 'आत्मलक्ष्यी समीक्षा', 'तेंडुलकरांची नाटके', 'शतकाची विचारशैली', 'दिल्या घरची मराठी', 'लर्न मराठी' इत्यादी पुस्तके. महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचे तीन पुरस्कार, बालभारतीच्या इंग्लिश पाठ्यपुस्तक समितीचे अध्यक्ष.
  टपाल-पत्ता: 'शरण्य', 47 स्वेदगंगा सोसायटी, वारजे, पुणे 411 058
  स्थिरभाष : (020)2523 0816, 2523 0759

- **भट-बेहेरे**, अनघा : एम॰ए॰ व पीएच॰डी॰ (रशियन), व्यावसायिक भाषांतरकार. पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागात रशियन भाषेचे अध्यापन, २००६मध्ये प्रकाशित झालेल्या रशियन-मराठी शब्दकोशाच्या निर्मितीत सहभाग. मराठी-रशियन-जर्मन हा त्रैभाषिक कोश प्रकाशित. 'केल्याने भाषांतर' ह्या त्रैमासिकाच्या सुरुवातीपासूनच्या संपादक.
  टपाल-पत्ता: 302 जय नर्मदा सोसायटी, गल्ली क्र॰ 11, प्रभात रस्ता, पुणे 411 004.
  चलभाष : 098226 11969;
  ई-पत्ता : anaghab2@rediffmail.com

- **मेहता**, कलिका : एम॰ए॰ (भाषाविज्ञान), मुंबई, एम॰ए॰ (मराठी) मुंबई, पीएच॰डी॰ (भाषाविज्ञान), डेक्कन कॉलेज, पुणे. केंद्रीय भारतीय भाषा संस्थान, मैसूर ह्यांच्या पुणे येथील पश्चिम विभागीय भाषा केंद्रात १९८२पासून अमराठी विद्यार्थ्यांसाठी मराठीचे अध्यापन. सध्या त्याच केंद्राच्या प्राचार्य म्हणून कार्यरत. अनेक प्रकारच्या शैक्षणिक साहित्याची निर्मिती.
  टपाल पत्ता : सी-7 सूर्यप्रकाश अपार्टमेंट्स, मार्केट यार्ड रस्ता, पुणे 411 037
  स्थिरभाष : (020)2421 4848;
  चलभाष : 098812 50083
  ई-पत्ता : kalikamehta311@gmail.com

- **परांजपे**, प्र॰ना॰ : एम॰ए॰, एम॰लिट॰, रामनारायण रुईया महाविद्यालय, मुंबई येथे इंग्रजीचे १५ वर्षे आणि पुणे विद्यापीठात वृत्तपत्र-विद्येचे ८ वर्षे प्रपाठक व १२ वर्षे प्रोफेसर म्हणून अध्यापन. ६ विद्यार्थ्यांना पीएच॰डी॰-साठी मार्गदर्शन. 'भाषा आणि जीवन'चे दहा वर्षे प्रमुख संपादक. एक कथासंग्रह, एक चरित्र, तीन भाषांतरे, पाच संपादने, पाच सहसंपादने व एक सहलेखन अशी १६ पुस्तके प्रकाशित. ह्याव्यतिरिक्त दहा पुस्तकांत व अनेक वर्तमानपत्रांत लेख समाविष्ट. संगीत-नाटक-स्पर्धेत लेखनाबद्दल महाराष्ट्र शासनाकडून प्रथम पारितोषिक देऊन गौरव.
  टपाल-पत्ता : एच-1 क्लॅरियन पार्क सोसायटी, औंध टेलिफोन एक्स्चेंजजवळ, पुणे 411 007.
  चलभाष : 094225 09638
  ई-पत्ता : pranaparanjpe@gmail.com

- **वाघ**, सलील : कवी. 'रेसकोर्स आणि इतर कविता'सह एकूण सात कवितासंग्रह प्रकाशित. शमशेर बहादूर सिंह ह्यांच्या हिंदी कवितांचा मराठीत परिचय करून देणारे पुस्तक प्रकाशित. 'अनुष्टुभ्', 'कवितारती', 'परिवर्तनाचा वाटसरू', 'नवाक्षरदर्शन', 'खेळ', 'लोकसत्ता', 'महाराष्ट्र टाइम्स', सकाळ', 'कालनिर्णय' ह्यांसारख्या अनेक नियतकालिकांतून व वर्तमानपत्रांतून लेख प्रसिद्ध. २००६चा पहिला 'शब्दवेध' सन्मान प्राप्त. कवितांचे इंग्रजी, हिंदी व मणिपुरी भाषांत अनुवाद प्रसिद्ध. रॅडिकल ह्यूमनिस्ट चळवळीशी संबंधित.

टपाल पत्ता : 81 कसबा पेठ, कसबा गणपती मंदिराजवळ, पुणे 411 011
चलभाष : 094225 11238
ई-पत्ता : saleelwagh@gmail.com

# राज्य मराठी विकास संस्था

(महाराष्ट्र शासनाचा उपक्रम)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महानगरपालिका मार्ग, धोबीतलाव, मुंबई ४०० ००१
दूरध्वनी : (०२२)२२६३ १३ २५ । फॅक्स २२६५ ३९६६
http://rmvs.maharashtra.gov.in

**स्थापना** – १ मे १९९२
**प्रमुख उद्दिष्ट** – मराठी भाषा आणि महाराष्ट्राची संस्कृती यांचे संरक्षण, संगोपन आणि संवर्धन
**प्रकाशने** – अभ्यासक, सर्वसामान्य वाचक, महाराष्ट्र शासन तसेच विविध मान्यवरांनी गौरविलेली ७१ पुस्तके प्रकाशित

## निवडक प्रकाशने

■ **कोशसूची**

१. मराठी ग्रंथसूची (भाग १ ते ६)
२. मराठी कोश व संदर्भसाधने यांची समग्र सूची
३. मराठी वैद्यक ग्रंथसूची
४. मराठी विज्ञानवाङ्मय सूची
५. वस्त्रनिर्मिती माहितीकोश (खंड १ ते ४)
६. यंत्रालयाचा ज्ञानकोश
७. फार्सी-मराठी व्युत्पत्तिकोश
८. दलित ग्रामीण साहित्य शब्दकोश (खंड १ ते ३)
९. विज्ञान संकल्पना कोश (इयत्ता ५वी ते १०वी)
१०. शालेय मराठी शब्दकोश (इयत्ता ५वी ते १२वी)

■ **भाषाविषयक**

१. मराठी भाषा : वाढ आणि बिघाड
२. वेलभाषा
३. भाषा आपली सर्वांचीच
४. वृद्धि : भाषेचे व भाषाभ्यासाचे विकसन
५. शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम
६. पालघर तालुका बोली, समाज व संस्कृती

■ **चरित्रमाला**

१. बालगंधर्व : व्यक्ती आणि कार्य
२. डॉ. अ.का. प्रियोळकर : व्यक्ती आणि कार्य
३. शंतनुराव किर्लोस्कर : व्यक्ती आणि कार्य
४. गंगाधर बाळकृष्ण सरदार : व्यक्ती आणि कार्य
५. व्याकरणकार मोरो केशव दामले व्यक्ती आणि कार्य
६. काकासाहेब कालेलकर : व्यक्ती आणि कार्य

■ **शालेय गट**

१. वाचू आनंदे (बाल व कुमार गट)
२. शिक्षणाचे अंतरंग
३. मराठी लेखन मार्गदर्शिका
४. का आणि कसे?
५. तारकांशी मैत्री

■ **श्राव्य पुस्तके**

१. दासबोध (५ सीडीजचा संच)
२. कृष्णाकाठ

## प्रशिक्षण योजना

- अमराठी भाषकांसाठी मराठीचे अध्यापन
- संगणक आणि मराठी भाषा
- मराठी व्याकरण - शिक्षक व स्पर्धा परीक्षार्थीसाठी
- अनुवाद प्रशिक्षण
- मोडी लिपी प्रशिक्षण

## महत्त्वाचे प्रकल्प

- दृक्श्राव्य मालिका : आकाशदीप व पिंपळपान
- दक्षिण भारतातील मराठी वाङ्मयाचा इतिहास
- आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
- महाराष्ट्राचा भाषिक नकाशा
- मोडी हस्तलिखितांचे देवनागरीकरण
- युनिकोडाधारित मराठी टंकांची निर्मिती
- मराठी संकेतस्थळांची स्पर्धा
- इ-पुस्तके (इ-बुक) निर्मिती
- दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण
- एन.सी.इ.आर.टी. तसेच विज्ञान प्रसार या संस्थांच्या पुस्तकांचे भाषांतर
- मराठीचे भाषिक टप्पे : दृक्श्राव्य मालिका
- भाषाविषयक चर्चासत्रे, सर्वेक्षणे, स्पर्धा, पुस्तक-प्रदर्शने इत्यादी प्रासंगिक उपक्रम

**सर्व प्रकाशनांवर ४० टक्के सूट ■ अधिक माहितीसाठी संस्थेच्या संकेतस्थळाला भेट द्या.**

पोस्ट-बुकपॅकेट-त्रैमासिक Book Packet Containing Periodical
NI No. 40048/83 | ISSN 2231-4059 Marathi Abhyas Parishad




प्रेषकः
प्रा० आनंद काटीकर
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद,
बी-5/16, सनसिटी, सिंहगड रस्ता,
आनंदनगर, पुणे 411 051.
Email: marathi.abhyas.parishad@gmail.com







